

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**



महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत
प्राज्ञपाठशाला मंडळ वाई, संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ३३ । अंक २ । नोव्हेंबर १९७९
किंमत २ रुपये । वार्षिक वर्गणी १८ रुपये

---



---

संपादक

मे. पुं. रेगे

---

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
पां. गो. आपटे,
व्यवस्थापक 'नवभारत' मासिक
द्वारा : प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )







अनुक्रमणिका

# नवभारत

नोव्हेंबर १९७९

अ नु क्र म



## लेखक-परिचय


⊙ **पां. ना. कुलकर्णी** – मराठीचे प्राध्यापक व विभाग प्रमुख, राजाराम कॉलेज, कोल्हापूर. ⊙ **प्रभाकर पाध्ये** : मराठी साहित्यिक, सौंदर्यमीमांसक, पत्रकार व विचारवंत; ३ कमलबाग चतुश्रृंगी, गोखले रोड, पुणे १६. ⊙ **बापूराव नाईक** : रंगभूमीचा सखोल अभ्यास व लेखन; माजी नियंत्रक महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक मंडळ; ३५, कलानगर; वांद्रे (पूर्व) मुंबई–४०० ०५१. ⊙ **मे. पुं. रेगे** : तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक; आय्. सी. एस्. एस्. आर्. होस्टेल, विद्यानगरी कालिना, मुंबई ९८. ⊙ **श्री. गो. पळसुले** : होमिओपाथी चिकित्सा पद्धतीचे तज्ञ, प्रख्यात डॉक्टर व ग्रंथ-लेखक, बुधवार पेठ, पुणे २. ⊙ **उमाकान्त कृष्णा कीर** : महाराष्ट्र कॉलेज मुंबई येथे मराठीचे अर्धवेळ प्राध्यापक, 'बेस्ट' मध्ये वरिष्ठ अनुवादक; ५, झपूर्झा, साहित्य सहवास; वांद्रे (पूर्व) मुंबई ५१ ⊙ **श्यामकांत कुलकर्णी** : मराठी कथाकार व विश्वकोशातील वैद्यक विषयाचे अभ्यागत संपादक, ७२५ / १ क / ९, आनंदबाग; नवी पेठ; पुणे ३०. ⊙ **सु. र. देशपांडे** : मराठी विश्वकोशात इतिहास, प्राच्यशास्त्र, पुरातत्त्वविद्या इ. विषयांचे संपादक, विश्वकोश, वाई. ⊙ **सौ. सौदामिनी चौधरी** : मराठी वाङ्मयाच्या अभ्यासक; काही काळ मराठीचे अध्यापन, १४४२ रविवार पेठ, वाई.


अनुक्रमणिका








## संपादकीय—

---

### सोन्याचे शब्द

'बोलणे चांदीचे असते, तर मौन सोन्याचे असते' असे एक वचन आहे. पण सत्याचे मुख ज्या सोन्याच्या भांड्यात बंद करून ठेवलेले असते अशी प्राचीन तक्रार (ईशोपनिषत) आहे ते भांडे बहुधा सोन्याच्या शब्दांचे बनलेले असणार. निवडणुकीच्या हंगामात एकंदरीत शब्दांची चलनवाढ झालेली असते. ह्यामुळे सोन्याचे शब्दही नेहमीपेक्षा अधिक चलनात असतात. ह्या शब्दांच्या अर्थांकडे आणि वापराकडे निरखून पहाण्यात उच्च दर्जाची बौद्धिक करमणूक असते.

पुढील विवेचनात कित्येक भारतीय राजकीय पक्षांच्या वक्तव्यांचा आणि घोषणांचा निर्देश अपरिहार्यपणे होणार आहे. पण कोणत्याही पक्षावर कोणत्याही स्वरूपाची टीका करणे हा ह्या विश्लेषणाचा उद्देश नाही. 'नवभारता'च्या प्रतिष्ठेला आणि प्रवृत्तीला साजेल असेच, म्हणजे "वागर्थ-प्रतिपत्ति" प्राप्त करून घेणे हेच, ह्या विश्लेषणाचे प्रौढ आणि संभावित उद्दिष्ट आहे.

'अधिकारशाहीला विरोध' हा एक सोन्याचा शब्दप्रयोग आहे. मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्ष आज 'अधिकारशाही'ला विरोध करण्यात आणि 'लोकशाहीवादी' पक्षांची आघाडी घडविण्यात अग्रेसर आहे. आता भारतीय संदर्भात अधिकारशाही वृत्तीचा अर्थ आपण, म्हणजे सर्वसाधारण लोक, असा करू : भारतीय राज्यघटनेच्या तरतुदींना अनुसरून लोकसभेत बहुमताने निवडून आलेल्या पक्षाच्या पुढाऱ्याने सत्ता हाती घेतल्यानंतर जर सत्तेवर अंकुश ठेवणाऱ्या संसदेला निष्प्रभ केले, सरकारच्या धोरणांवर आणि कृतींवर टीका करण्याचा लोकांचा घटनेने दिलेला हक्क, जर मर्यादित केला किंवा हिरावून घेतला, ह्याचाच एक भाग म्हणून वर्तमानपत्रांवर 'सेन्सॉरशिप' लादली, कायद्याच्या तरतुदी आणि 'नैसर्गिक न्यायां'ची तत्त्वे ह्यांना अनुसरून तटस्थपणे निवाडा देणाऱ्या न्यायसंस्थेवर दडपणे आणून तिची स्वायत्तता हिरावून घेतली तर हे आचरण अधिकारशाहीवृत्तीचा आविष्कार ठरेल. श्रीमती इंदिरा गांधी यांनी आणीबाणी लादण्यात आणि लादल्यानंतर ह्या स्वरूपाचे आचरण केले असे आरोप करण्यात आले आहेत.

ह्या स्वरूपाच्या आचरणाला कोणत्याही मार्क्सवादी पक्षाचा विरोध असू शकत नाही, उलट ते योग्य, इष्ट, अपरिहार्य आहे, असे आचरण करणे ही इतिहासाने कामगारवर्गावर आणि कम्युनिस्ट पक्षावर सोपविलेली जबाबदारी आहे हा अशा पक्षाचा एक मूलभूत सिद्धांत आहे. मार्क्सवादाप्रमाणे श्रमजीवी वर्गाची, ( ह्यात कोणकोण आले ? कामगारवर्ग. आणि माओनंतर शेतकरीवर्ग ? ) हुकूमशाही, 'अधिकारशाही', प्रस्थापित होणे अटळ आहे आणि इष्ट आहे. (कारण मार्क्सवादाप्रमाणे जे इष्ट आहे ते अटळ आहे आणि जे अटळ आहे ते इष्ट आहे) मार्क्स–लेनिन–स्टालिनवादाप्रमाणे आणि प्रथेप्रमाणे, व्यवहाराप्रमाणे, श्रमजीवीवर्गाची हुकूमशाही ही कम्युनिस्ट पक्षाची श्रमजीवीवर्गावरील आणि सर्व समाजावरील हुकूमशाही असते, ती स्टालिन किंवा माओ किंवा जो कोणी असेल तो, ह्यासारख्या सर्वश्रेष्ठ नेत्याची कम्युनिस्ट पक्षावरील हुकूमशाही असते. 'व्यक्तिस्वातंत्र्य', 'कायद्याचे राज्य', 'न्यायसंस्थेची स्वायत्तता' ह्या केवळ भांडवलदार-वर्गाने, त्याचा मिंधा असलेल्या कनिष्ठ मध्यमवर्गाने आणि अमेरिकन साम्राज्यशाहीच्या धावत्या

अनुक्रमणिका

कुऱ्यांनी ' जनते'ला चकविण्यासाठी आणि तिची पिळणूक करण्यासाठी निर्माण केलेले आभास आहेत. खरा न्याय, इतिहासप्रणीत न्याय ' वर्गशत्रू'चे निर्दालन करण्यात असतो. खरा न्याय हा न्यायालयात बसणारे, प्रचंड पगार घेणारे आणि विचित्र टोप परिधान करणारे न्यायाधीश देत नाहीत. ते देतात तो ' बूर्ज्वा ' न्याय असतो. खरा न्याय ' जनता–न्यायालये ' देते, म्हणजेच कम्युनिस्ट पक्ष देतो, म्हणजेच कम्युनिस्ट पक्षाचा सर्वश्रेष्ठ नेता देतो. लाखो लोकांना ' कॉन्सन्ट्रेशन कँप्स'मध्ये पाठवून गुलामांसारखे राबविणे आणि ठार मारणे हा स्टालिनच्या अमदानीत न्याय होता. कारण तो जनतेने, म्हणजे कम्युनिस्ट पक्षाने, म्हणजे पक्षाच्या सर्वश्रेष्ठ पुढाऱ्याने दिलेला न्याय होता. पुढे, ज्यांनी हे सर्व भोगले आणि जे मेले ते निरपराधी होते असे ख्रुश्चोव ह्यांनी जेव्हा जाहीर केले आणि त्यांची पुनः स्थापना केली ( म्हणजे जे मारले गेले होते त्यांना जिवंत केले नाही, पण ते हकनाक मेले असे जाहीर केले ) तेव्हा ह्या सर्व मेलेल्यांना न्याय मिळाला. पुढे जेव्हा ख्रुश्चोव चुकले आणि स्टालिन एकंदरीत बरोबर होता हे सत्य प्रकट झाले– म्हणजे कम्युनिस्ट पक्षाच्या सर्वश्रेष्ठ पुढाऱ्याने, ( जो कोणी असेल तो; ह्या मंडळींची नावे उच्चारणे किंवा लिहिणे मराठी जिभांना किंवा बोटांना कठीण ठरते ) जाहीर केले, तेव्हा ह्या सर्व मेलेल्यांना परत एकदा खरा न्याय मिळाला. ' कालो ह्ययं निरवधिः ' ह्या मंडळींना आलटून पालटून खरा न्याय अनंतकालपर्यंत मिळत रहाणार यात काही शंका नाही.

तेव्हा ज्या प्रकारची कृत्ये इंदिरा गांधी ह्यांनी केली असा आरोप करण्यात येत आहे त्या प्रकारची कृत्ये मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षाच्या दृष्टीने अजिबात आक्षेपार्ह नाहीत. उलट ती करणे आवश्यक आणि योग्य आहे असेच त्यांचे सैद्धांतिक म्हणणे आहे. पण ती करण्याची जबाबदारी इतिहासाने मार्क्सवादी पक्षावर सोपविलेली आहे. ही गोष्ट इंदिरा गांधी ह्यांना समजलेली नाही. अर्थात् ' डायालेक्टिक'चा खोल अभ्यास केल्याशिवाय ती कुणालाही समजणार नाही. ह्यामुळे त्यांनी ती कृत्ये स्वतःच केली. ह्याच्यात त्यांनी इतिहासाच्या पवित्र नियमांचा भंग केला. हे पाप त्यांनी केले. हे पाप त्या कुठे फेडतील ? ते फेडायची संधी त्यांना द्यायची तर निदान एकतरी ' कॉन्सन्ट्रेशन कँप ' आयोजित करावा लागेल. कॉन्सन्ट्रेशन कँपमध्ये निदान वेळ कसा घालवावा हा प्रश्न इंदिरा गांधींना पडणार नाही. काम भरपूर असेल. ' कंपनी ' भरपूर आणि विविध असेल. अटलबिहारी, मोरारजी, जगजीवनराम, चव्हाण, एस्. एम्. , देवरस हे सर्व त्यांना तेथे भेटतील. खरा फॅसिस्ट कोण ह्याची चर्चा करता येईल. शिवाय कॉन्सन्ट्रेशन कँपमधील रहिवाशां सरासरी आयुष्य कमी असते, म्हातारपणी गलितगात्र झाल्यावर आपले कसे होईल ही चिंता पडायचे कारण नसते असा अनुभव आहे.

सारांश, मार्क्सवादी कम्युनिस्टांचा खरा आक्षेप ' अधिकारशाहीवादा 'ला नाही, तो इंदिरा गांधी ह्यांच्या अधिकारशाहीवादाला आहे. लोकशाही नष्ट करण्याला त्यांचा विरोध नाही तर इतर कुणी लोकशाही संकुचित किंवा नष्ट करून स्वतःची निरंकुश सत्ता स्थापन करू पहातील तर त्याला मार्क्सवादी कडाडून विरोध करतील. फाशीची शिक्षा झालेला कैदी आजारी पडला तर जेलर ज्या आस्थेने त्याला औषधोपचार करून बरे करण्याची धडपड करतो त्या आस्थेने मार्क्सवादी लोकशाहीला जपत असतात. पण " आम्हाला लोकशाही नष्ट करून आमची अधिकारशाही स्थापन करायची आहे आणि म्हणून ह्याच्या आड येणाऱ्या इंदिरा गांधी यांच्या अधिकारशाहीला आमचा विरोध आहे " असे म्हणणे विचित्र, बालिश, ओबडधोबड दिसते. हा सर्व अर्थ अलगदपणे, कुणालाही आणि कसलाही धक्का न देता, व्यक्त करण्याचे सामर्थ्य ' अधिकारशाहीला विरोध ' ह्या सोनेरी शब्दप्रयोगात आहे.

असा दुसरा सोनेरी शब्दप्रयोग म्हणजे ' जातीयवाद '. भारतात जेथे जेथे आणि जेव्हा जेव्हा जातीयवादाला विरोध करायला आणि निधर्मीपणाचा पुरस्कार करायला मंडळी जमतात तेव्हा मुस्लिम

लीग, जमाते इस्लामी इ. संघटना आघाडीवर असतात हे प्रसिद्धच आहे. किंबहुना मुस्लिम लीग जर पक्षांच्या एखाद्या आघाडीत सामील नसेल किंवा तिला अनुकूल नसेल तर ती आघाडी जातीयवादी असणार अशी दाट शंका निर्माण होते. भारतात संशयातीतपणे राष्ट्रवादी असण्याचा, जातीयवादी नसण्याचा एकच मार्ग आहे. यासाठी तुम्ही मुसलमान किंवा ख्रिश्चन असला पाहिजे किंवा बनला पाहिजे. हे तुम्हाला शक्य नसेल तर मुस्लिम लीग, चर्च ह्या प्रकारच्या संघटणांनी 'तुम्ही जातीयवादी नाही' असे शिफारसपत्र तुम्हाला दिले असले पाहिजे. ( हा उत्तरोल्लेखित पर्याय अर्थात् गौण आहे. ) हे सत्य इतके गुह्य आहे, गोंधळून टाकणारे आहे की अलौकिक प्रतिभेची देणगी असलेली माणसेच त्याचा भेद करू शकतात. सामान्य, भाबडी माणसे, "फावडे हे फावडे असते आणि म्हणून त्याला 'फावडे' म्हटले पाहिजे" असे मानणारी सरधोपट माणसे घेतली तर जातीयवादाला विरोध करायला मुस्लीम लीग पुढे येते, आणि जातीयवादविरोधी पक्ष म्हणून मुस्लिम लीगला इतर पक्ष मान्यता देतात. विशेषतः इतर पक्षांचे 'द्रष्टे' पुढारी मान्यता देतात हे ऐकून चाट पडतात. 'जातीयवाद', निधर्मीवृत्ती' हे सोन्याचे शब्दप्रयोग आहेत. हे त्यांच्या ध्यानात आलेले नसते.

ह्या सोनेरी शब्दप्रयोगांचे अर्थ असे स्पष्ट करता येतील : ज्या देशात मुसलमान बहुसंख्य असतात किंवा मुसलमानांच्या हातात सत्ता असते त्या देशात इस्लामी राज्य असण्यात निधर्मीपणा असतो. (ही आदर्श परिस्थिती असते कारण तिच्यात धर्म आणि न-धर्म ही परस्परविरोधी टोके एकरूप पावलेली असतात.) पण ज्या देशात मुसलमान अल्पसंख्य असतात किंवा त्यांच्या हाती सत्ता नसते त्या देशात (मुसलमान बहुसंख्य होईपर्यंत किंवा त्यांच्या हाती सत्ता येईपर्यंत) कोणत्याही धर्माप्रमाणे राज्य न चालण्यात निधर्मीपणा असतो. पण राज्य तर धर्माप्रमाणे चालले पाहिजे, म्हणजे सर्व कायदे, व्यवहार धर्मात सांगितल्याप्रमाणे असले पाहिजेत. आणि इस्लामेतर धर्माप्रमाणे चालता कामा नयेत. ह्यातून एकच मार्ग निघू शकतो. आणि तो हा की भारतासारख्या मुस्लिम अल्पसंख्य असलेल्या देशात मुस्लिम जमात हे एक स्वायत्त उपराज्य आहे असे मानून त्याच्याशी इतरांनी वर्तन केले पाहिजे. भारतीय संसद सार्वभौम असली तरी आणि घटनेतील तरतुदीप्रमाणे ती कायदे करू पहात असली तरी मुसलमान जमातीत कुराण, हदिस ह्यांच्यावर आधारलेले जे कायदे किंवा प्रथा प्रचलित असतील त्यांच्यात ढवळाढवळ करण्याचा अधिकार तिला नाही. ही सर्व सत्ये ओळखणे आणि स्वीकारणे ह्याच्यात निधर्मीपणाचे सार आहे. 'निधर्मीपणा'चा अर्थ स्पष्ट झाल्यावर 'जातीयवादा'ची व्याख्या करणे सोपे आहे. निधर्मीपणात सामावलेली ही सत्ये जो स्वीकारीत नाही तो जन्माने हिंदू असला तर जातीयवादी असतो आणि जन्माने मुसलमान असला तर 'गद्दार' असतो. उदा. "स्त्रीपुरुषांची समानता आपण मानली पाहिजे आणि म्हणून मुस्लिम पुरुषांना चार पत्नी करण्याची किंवा पत्नीला जबानी तलाक देण्याची जी मुभा आहे ती रद्द केली पाहिजे" असे जो समाजवादी खाजगीत म्हणतो पण सार्वजनिक रीत्या "मुस्लिम वैयक्तिक कायद्यात ढवळाढवळ करता कामा नये" असे जाहीर करतो तो ( हिंदू असला तर ) खाजगीत जातीयवादी असतो आणि सार्वजनिक भूमिकेत निधर्मी असतो. हे काहीसे गुंतागुंतीचे उदाहरण, वर दिलेल्या निधर्मीपणाच्या मूलभूत सिद्धांतांना अनुसरून स्पष्ट केल्यानंतर, जातीयवाद किंवा निधर्मीपणा ह्यांच्याविषयीची अधिक मामुली कोडी सहजच सोडविता येतील.

'फॅसिस्ट' हा शब्द बावनकशी सोन्याचा आहे. आणीबाणीत जयप्रकाशजींचे फॅसिस्ट असे वर्णन करण्यात आले होते. आणीबाणी उठल्यानंतर अनेकदा इंदिरा गांधी ज्या प्रकारचे राजकारण करतात ते फॅसिस्ट आहे असे म्हणण्यात येऊ लागले. राष्ट्रीय स्वयंसेवक संघ फॅसिस्ट आहे ह्याविषयी अस्सल समाजवाद्याच्या मनात शंका असू शकत नाही. (कुणाही व्यक्तीच्या समाजवादी निष्ठेचा अस्सलपणा अजमावण्यासाठी हा निकष म्हणून वापरता येईल. ) ह्या तीन प्रवृत्तींना उद्देशून 'फॅसिस्ट' हा शब्द वापरायचा त्या तिहीत काही समान धर्म असले पाहिजेत आणि ते सापडणे अतिशय कठीण आहे.

ह्या परिस्थितीत पुढील उपायाचा अवलंब करणे अपरिहार्य ठरते. आपण असे मानू की 'फॅसिस्ट' हा एक शब्द येथे नसून फॅसिस्ट–१, फॅसिस्ट–२ आणि फॅसिस्ट–३ असे तीन शब्द आहेत. जयप्रकाशजी फॅसिस्ट–१ होते असे म्हणू. मग 'क्ष हा नेता फॅसिस्ट–१ आहे' ह्या वाक्याचा अर्थ 'क्ष हा नेता निःस्वार्थतेने, जनहिताच्या तळमळीने, लोकांना विधायक कार्याची प्रेरणा देतो, आणि त्यांचे शिक्षण करून व त्यांना संघटित करून अहिंसेच्या मार्गाने अन्यायाविरुद्ध झगडण्याचे सामर्थ्य त्यांच्यांत निर्माण करतो'. उदा., गांधीजी हे फॅसिस्ट – १ होते हे उघड आहे. 'रा. स्व. संघ हा फॅसिस्ट – २ आहे' ह्याचा अर्थ "निःस्वार्थतेने, निष्ठेने, सातत्याने, पण एकांगीपणे विचार केल्याने जडलेल्या आंधळेपणे समाजाचे संघटण करू पहाणारी ही संस्था आहे" असा लावता येईल. इंदिरा गांधी ह्यांना उद्देशून लावायच्या 'फॅसिस्ट – ३' ह्या शब्दाचा अर्थ लावण्याचे काम चाणाक्ष वाचकांवर सोपवावे लागेल. केवळ सुसंगतीच्या आणि वैचारिक स्पष्टतेच्या नादी लागून 'फॅसिस्ट' ह्या एका गुळगुळीत शब्दाच्या जागी अशा तीन शब्दांची स्थापना करण्याचा तार्किक खटाटोप आपण केला तर त्याचा काय परिणाम होतो हेही चाणाक्ष वाचकांच्या ध्यानी येईल. असे केल्याने मूळ शब्दातील किमया उडून जाते आणि हातात तीन रुक्ष, गद्य, मठ्ठ शब्द उरतात.

तेव्हा राजकारणातील रंग उडून जाऊ नये ह्यासाठी शब्दांमधील ह्या किमयेला जपले पाहिजे. जेव्हा जागतिक श्रमजीवी वर्गाचा अविच्छेद्य घटक असलेला एखाद्या बँकेतील अधिकारीवर्ग दरमहा रु. ३००० चे वेतन रु. ३५०० पर्यंत तरी वाढवावे म्हणून वर्गलढा उभारतो तेव्हा, ह्या मंडळींना अधिक पैसा न देता तो बेकारांसाठी चालविलेल्या रोजगार हमी योजनेवर खर्च करा असा आग्रह धरणाऱ्या प्रतिगाम्यांचा, भांडवलदारांच्या बगलबच्च्यांचा आणि सी. आय्. ए. च्या एजंटांचा डाव एखादा क्रांतिकारक डावा पक्ष जेव्हा हाणून पाडतो तेव्हा त्याचा सर्व आधार ह्या शब्दांच्या किमयेवर असतो.

माणूस हा कपडे घालणारा प्राणी आहे. कपडे घालीत नसे तेव्हा तो आपले शरीर निदान रंगवीत असे. नागडेपणा माणसाला सहन होत नाही. 'जे, जे असते ते, ते जे असते ते असते आणि जसे असते तसे असते, आणि ते जे आणि जसे असे त्याहून वेगळे नसते' हा तार्किकांचा मूलभूत सिद्धांत आहे. पण हा यांत्रिक तर्कवाद झाला. 'तार्किक उपपत्ती रंगहीन असते पण जीवनाचे प्रसन्न सोनेरी झाड हिरवेगार असते' असे गटेचे वचन आहे. जे आहे ते असेल तेथे असणारच. पण जे नाही ते आहे आणि जे आहे ते नाही असे करण्याचे जे सामर्थ्य मायेच्या ठिकाणी असते ते तिच्या आवरण आणि विक्षेप ह्या दुहेरी शक्तीमुळे. ही शक्ती ज्या शब्दांच्या अंगी विशेषेकरून असते तेच सोन्याचे शब्द ठरतात. त्यांचे झाकण काढून घेतले तर खाली हिडिसपणाच उरेल.

पां. ना. कुलकर्णी

# चौंभाचे 'उखाहरण' : एक तापदायक संपादन ( उत्तरार्ध )

[ या लेखाचा पूर्वार्ध 'नवभारत'च्या ऑक्टोबर, ७९ अंकात प्रसिद्ध झाला. हा उत्तरार्ध– का. सं. ]

---

**सदोष शब्दरूपांचा विचार--**

१ ) कवी बाणाच्या शिवभक्तीचे वर्णन करीत आहे–

शुध तांबयाचीं तगटें । तैसीं धोत्रें नेसला चोखटें ।
तंव **वडवेनि** आनीलें । हरीचंदणाचे वाटें ॥ ७९ ॥

शब्दसूचीत 'वडवा ( स्त्री ) – ? सेवक ? ' अशी नोंद आहे. 'सेवक' शब्दामागील प्रश्नचिन्ह कशासाठी ? लिंगनिर्णयाविषयी संशय व्यक्त करायचा असता तर ते 'स्त्री' पुढे पण कंसात द्यायला पाहिजे होते. छापण्याच्या या प्रकारावरून असे वाटते की प्रथम अर्थाविषयी संशय दर्शविला, मग 'सेवक' असा अर्थ सुचवला; पण तोहि शंकास्पद वाटला म्हणून त्यापुढेही प्रश्नचिन्ह ठेवले. येथे 'बडवेनि' हवे. 'वड(डु)वा' या पुल्लिंगी शब्दाचा अर्थ पुजारी किंवा सेवक.

२) बाणाच्या मयूरध्वजाचा भंग झाला, त्या आधीही काही दुर्निमित्ते झाली. सारी सभा 'कोमाईली'. त्यावेळी प्रधानाने म्हटले, 'बाणाने शिवाकडे मागितलेल्या वराचा हा 'वडिवारु' आहे.' मग कवी लिहितो,

ऐसें प्रधानु बोलीला । तंव रावो कांटाळला ।
गर्व गेला वांटिवेचा । आळुमाळु **कोयला** ॥२१५॥

येथे 'कोयला' च्या जागी 'कोमाय (इ) ला' अशा पाठाची अपेक्षा आहे. राजा किंचित कोमेजला, खिन्न झाला असा अर्थ अभिप्रेत असता संपादक निर्धास्तपणे सांगतात, 'कोयला (स्त्री)- एक पक्षी २१४' ओवीचा संदर्भ देण्यात तर चूक झाली आहेच पण या स्त्रीलिंगी पक्ष्याला बसायला किंवा उडायला या ओवीत 'अवकाश'च नाही !

३) नारदाचा आचार कसा होता ?

भीक्षा मागे वहु थोडी ।
स्वानें मेळवी वापुडीं ।
मग **रासे बीदी** चोहटां ।
मुनी खापर फोडी ॥ ४४७ ॥

'रासे बीदी' च्या जागी 'राज(जे) बीदी' असेल काय ? २१६२ व्या ओवीत 'राजबीदी' आहे. सूचीतून या 'रासे'ची नोंदच गा(ग ?) ळली.

४) द्वारकेत शिरण्यापूर्वी चित्ररेखा व नारद यांची भेट झाली. तिच्या आगमनाचा हेतू कळताच बाणासुर व यादव यांत युद्ध होईल असे नारदास वाटले. ते तुंबळ युद्ध पहावे ही त्याची इच्छा.

ऐसें तयासि **पडलें अटक** ।
तंव एरी उतावीळ आईका ।
मज लागत असे वेळु ।
ऐसें म्हणताए चीत्ररेखा ॥ ४५७ ॥

'पडलें अटक' ऐवजी 'पडलें टक' असावे. 'टक पडणे' म्हणजे एकाग्र होणे, आश्चर्यस्तब्ध होणे. या अर्थाने हा वाक्प्रचार प्राचीन साहित्यात आढळतो. ओवीचा आशय पाहता हाच अर्थ योग्य वाटतो. संपादकांनी मात्र 'अटक' हा पाठ प्रमाण मानून 'प्रतिबंध, अटकाव' असा अर्थ दिला. नारदाला कसलाच 'प्रतिबंध पडलेला' नाही. चित्ररेखेच्या उतावळीला नारदाची एकाग्रता, स्तब्धता मानवण्यासारखी नव्हती हा विरोध कवीला येथे दाखवायचा आहे.

५) बापु **बीळीया** आणोर्धु ।
आनिका कवणा सांवरेणा ॥ ६४९ ॥

'बीळीया' हा प्रतकाराचा हस्तदोष उघड असता







हे लेखन प्रमाण मानून संपादक 'बलवान' असा अर्थ देतात. पाठ बरोबर असेल तर अर्थ पटत नाही आणि अर्थ बरोबर असेल तर पाठ चूक आहे असे म्हणायला हवे. पण प्रश्नचिन्ह नसल्याने संपादक दोहोंविषयी निःशंक आहेत असे दिसते. रा. पाठ 'बळीया' असा आहे, पुढे ओ. १२४१ त 'बळीया' असा शब्द आहेही. संपादकांना या गोष्टी विचारात घेण्याची गरज का भासू नये? राजवाडे, देशपांडे यांच्या संहिता पाहिल्या, उतरून काढल्या एवढ्याने संपादकांचे कर्तव्य संपले काय? पाठ व अर्थ यांच्या निश्चितीचा विचार वाचकांनी करायचा काय? पण संपादकांवर भिस्त ठेवणाऱ्यांची दिशाभूल होते त्याचे काय?

६) कृष्ण चाल करून आल्याचे सांगताना प्रधान बाणास म्हणतो—

जेणें मारिले सुर-असुर ।
फेडिला पृथवीचा भारु ।
आतां होईल **जगवाळु** ।
पावला साहानसमुद्र ॥ ११३७ ॥

सूचीत 'जगवाळु' पुढे 'जगाचा विनाश(?)' असे स्पष्टीकरण आहे. संपादकांना अर्थाविषयी शंका आहे, पाठाविषयी नाही. वस्तुतः येथे 'जगबोळु' असायला हवे. तसा शब्द ओ. १३३२ त आहे, सूचीत नोंदलाही आहे. पण मागेपुढे पाहून विचार करायचा कोणी?

## शब्दाची जात ओळखा—

१) प्रधानाच्या आश्वासक सूचनेवरून अनिरुद्धाच्या हातातील गरुडपाचीची मुद्रिका आणायला उषा निघाली आहे. रूपकात्मक भाषेत कवी या घटनेचे वर्णन करीत आहे—

अशुद्धें भरला रणसागरु ।
उखा लावण्याचें तारुं ।
जाति असे अणोर्धा दीपा ।
मदनांचे केणें भरुं ॥ ६९१ ॥
पालउ झळकत असे चोखडा ।
जैसे उभारिलें सीड ।
आवडीचेनि **सुवारीएं** ।
जात असें झडझडां ॥ ६९२ ॥

'सुवारीएं' मधील 'सुवारा' या मूळ शब्दाची जात संपादकांनी 'वि' म्हणजे विशेषण म्हणून सांगितली आहे!

(२) बाणासुराने मोहना - शस्त्र सोडले, त्यामुळे युद्ध करायचे विसरून यादव त्या 'मोहोनी'कडे पाहातच राहिले. तेव्हा कृष्णाने एक भयंकर असुर निर्माण केला. त्याचे वर्णन करताना चोंभा लिहितो—

पर्वतु मुग्दलु ('मुद्गलु' हवे) खांदावरी ।
दाढा निगालीया बाहेरी ।
**भोंवती** डोळचांचे वाट ।
अग्निकुंडाचिया परी ॥ २००३ ॥

('वाट' या पुल्लिंगी शब्दाची नोंद नाही.) 'भोंवती (अ)- सभोंवार' अशी संपादकांची नोंद आहे. 'गरगरां भोंवताति डोळे' (६१३), 'डोळघांचे वाट भवंति' (१४७६) आणि वरील ओवीतील तिसरा चरण या ठिकाणीं 'भों (भं) वणे' या धातूची वर्तमानकालवाचक रूपे आहेत, हे ओळखता येते काय?

३) उषा–अनिरुद्ध - विवाहानंतर कृष्णादिकांना बोळवीत बाणासुर निघाला आहे—

पुढें आंदन निगालें देखा ।
धेनुचे कळप आईका ।
रथांवरि वस्त्रें भांडारें ।
टीकठौळ मोतीं मानीक ॥ २२१६ ॥

'टीकठौळ (वि)– रत्ने ?' या नोंदीवरून संपादकांना या शब्दाच्या विशेषणत्वाबद्दल खात्री आहे पण अर्थाविषयी शंका आहे असे दिसते. 'टी (ठी) क' म्हणजे रत्न व 'टौळ' म्हणजे समूह. तेव्हा 'टीकठौळ' या सामासिक शब्दाचा अर्थ रत्नसमूह. हे विशेषण आहे होय?

४) उषा उपवर झाली म्हणून तिचा विवाह करण्याची भाषा बाणासुराने प्रधानाजवळ काढली. त्यानंतर त्याला अपशकुन होतात—

नेनों कैसें धुधुवात । गगणिहुनि सर्प पडत ।
ऐसें अवचीतें उदेलें । दुरिनिमित्य ॥ २०६ ॥

'धनुषांचेनि टणत्कारें । धुधुवात कांडांचे पीसारे । ...' (१३८१) आणि 'निवटताति मकतोंडें । एताति **धुधुवातें** कांडें । ...' (१३८३) या तिन्ही ठिकाणीं 'धुधुवणे' (= धुधुकार करणे) या धातूपासून साधलेली रूपे आहेत हे मान्य आहे का पहा.









सूचित 'धुधुवात (पु) – झंझावात २०६' असे स्पष्टीकरण आहे. पण येथील 'धुधुवात' हे पुल्लिंगी नाम नव्हे आणि 'झंझावात' हा त्याचा अर्थही नव्हे.

५) चोंभा प्रद्युम्नजन्माचा वृत्तांत सांगत आहे–

रुक्मीणीसि **जाला कोणु।**
जन्म पावला मदनु । ... ३७२

संपादक लिहितात, 'कोणु (सर्व)–प्रश्नार्थक सर्वनाम ३७२' कंसात 'सर्व' म्हणजे सर्वनाम अशी जात सांगितल्यावर अर्थाच्या जागी 'प्रश्नार्थक सर्वनाम' छापून गोंधळ केला आहे. येथे 'कोणु' हे पुल्लिंगी नाम आहे हे पटते काय पहा. 'कोण (न, णु) होणे' हा वाक्प्रचार असून त्याचा अर्थ आहे 'प्रसूत होणे' – राजवाडेप्रतीच्या पृ. ६४ आ वर (प्रस्तुत संपादन, परिशिष्ट पृ. २१५) आणखी आधार मिळतो. अनिरुद्ध चोरून नेला गेल्यानंतर त्याची आई शोक करताना रुक्मिणीस म्हणते–

नव मास पुरौनु । ज्या द्वीसीं मज **जाला कोनु।**
जातक वर्तीलें ऐसें । होईल पद्मना स्मानु ॥३१॥

६) भेणें शेषु मौळे फणी ।
तरि कवणु सावरील हे मेदनी ॥
एव्हवीं पृथ्वीचें डीवाळ ।
उलंडतें एरे वाणी ॥१३७७॥

सूची सांगते, 'वाणी (शब्द)– प्रमाणे.' पण 'वाण' म्हणजे बाजू, म्हणून वाणी = बाजूला. मग हे शब्दयोगी अव्यय आहे काय ?

७) मग **विव्हाया** प्रद्युम्ना ।
बाणासुरे दीधलें क्षेम आळींगण ॥
म्यां उखा तुम्हां निरोवीली ।
धाकुटें लेंकरुं अज्ञान ॥२२१८॥

येथे 'विव्हाया' हे 'विव्हाई' (=विवाही, व्याही) या शब्दाचे सामान्यरूप आहे. प्रद्युम्न हा बाणासुराचा व्याही. त्याला क्षेमालिंगन देऊन बाणाने उखा हे आपले 'धाकुटें लेंकरुं अज्ञान' निरवले. संपादक लिहितात, 'विव्हायणे (क्रि)– विवाह करणे.' संपादकांनी आता 'विव्हाया'चा काल व अर्थ सांगावा !

**चुकीचे लिंगनिर्देश–**

१) मानवीयांचा विव्हावो कीजे ।
आड **जमनीक** धरीजे । ... ५४१

हा संदर्भ देऊन 'जमनीक' हा पुल्लिंगी शब्द असल्याचे सांगतात. पण येथे लिंगनिश्चिती करता येत नाही. 'दोंही सैन्यीं धरीलीया जमनीका' (१३६०) आणि 'फिटली बाणाची जमनीक' (१८१०) या दोन स्थलांवरून 'जमनीक' स्त्रीलिंगी आहे हे सिद्ध होते मग संपादक काहीही सांगोत.

२) शंकर कृष्णस्तुती करीत आहे–

दिवसा सुर्यो होउनि तपसी ।
रात्रीं चंद्र होऊनि नीववीसी ॥
वरुसा **रीतु** जळधरु ।
होउनियां वरुषसी ॥२०४२॥

या ओवीचा आधार घेऊन 'रीतु' पुल्लिंगी असल्याचे संपादक जाहीर करतात. पण येथे लिंगनिर्णय करण्यास आधार नाही. संपादकांना काय वाटते यापेक्षा कवी वापर कसा करतो हे पाहणे आवश्यक असते. 'वसंतरीतु निवर्तली । ग्रीष्मरीतु प्रवर्तली' (२५९) या ओवीवरून चोंभा 'रीतु' हा शब्द स्त्रीलिंगी मानतो हे स्पष्ट आहे.

३) 'भोगु पुरलीयां पावे वीधी' (१६०) यावरून संपादक म्हणतात त्याप्रमाणे 'वीधी' पुल्लिंगी कसा ठरवायचा ? 'अवघड देखा **वीधी**' (१८६६), 'बहुतां एज्ञी नाना **वीधी**' (२१६०) या दोन स्थळांवरूनही लिंग सांगता येत नाही. मात्र 'विधी दैत्याची गोमटी' (१८०४) हा आधार निर्णायक आहे. चोंभा 'वि (वी)धी' शब्द स्त्रीलिंगी मानतो. संपादकांशी तो सहमत होऊ शकत नाही.

**अर्थनिश्चितीचे अद्भुत चमत्कार !**

हे थोडेथोडके नाहीत. प्राचीन कवी गुरूंच्या बाबतीत मोठे भाग्यवान होते. परंतु संशोधक-संपादकांच्या बाबतीत ते अनेकदा दुर्दैवी ठरले आहेत. चोंभासारखा एक रससिद्ध कवी बहुतकाळ अज्ञात रहावा हे शल्य मनाला डाचत होतेच. आता तो प्रगट झाला याचा आनंद मानावा की त्याला समजून घेण्याच्या बाबतीत निर्माण झालेले अडथळे दूर करण्याचे कष्ट उपसावेत हेच समजेनासे झाले आहे. विद्यापीठीय स्तरांवर अनेकांगांनी चोंभाचा अभ्यास करण्यासारखा आहे. प्राचीन साहित्यातील उतारे घेताना चोंभाची प्रतिष्ठा राखावीच लागेल पण या संपा-

दनात त्याची जी पाठराखण केली गेली आहे ती रसिकांना व अभ्यासकांना तापदायक ठरली आहे. उतारे घ्यावेतच पण संहिता आणि शब्दार्थ मात्र या संपादकांवर विसंबून अन्य संपादकांनी घेऊ नयेत हे सांगितल्याविना राहावत नाही. संपादकांच्या अर्थ-निश्चितीचे काही विनोदी नमुने आता वाचकांपुढे सादर करून हा लेख आवरावा हे बरे.

१) **उदयभास्करू** चोखडा।
कर्पुरेंसी घेतला वीडा ॥
मुखीं फोडी हाति पाणें।
मग निगाली झडझडां ॥ २३३ ॥

उषा भवानीच्या दर्शनाला जाणार आहे. येण्या-जाण्यात उशीर झाला तर राजकुमरी उषा भुकेजेल म्हणून चित्ररेखा गडबड करीत आहे. चित्ररेखेचे कोणतेही वचन न अव्हेरणारी उषाही मग तिच्या शब्दासरशी उठली आहे. कर्पूरविडा खाण्याच्या वेळच्या तिच्या धांदलीचे चित्र चोंभाने येथे रेखाटले आहे.

'पाणें' याचा राजवाडयांनी सांगितलेला 'उदक-पात्र' हा अर्थ न घेता य. ग. फफ्यांनी सांगितलेला 'पाने (विडयाची)' हा उचित अर्थ संपादकांनी स्वीकारला पण फफ्यांनी स्पष्ट केलेला ओवीचा आशय त्यांनी बारकाईने लक्षात घेतला नाही. डॉ. पठाणांसारख्या महानुभाव साहित्याच्या अभ्यास-काला 'उदयभास्करू'चा योग्य अर्थ फफ्यांच्या स्पष्टीकरणाच्या आधारावर सांगता येऊ नये हे दुर्दैव होय ! 'उदयभास्करू' हा उत्कृष्ट कापराचा एक प्रकार आहे. 'गोविंदप्रभुचरित्रा'त 'कापुरु मागणे' (२९३) या मथळयाची एक लीळा आहे. तीत या मोलाच्या कापराचा निर्देश आहे. 'श्रीऋद्धिपुर-वर्णना'त उदयेभास्कराचेनि वासे : नुरेचि दुर्गंधितम जैसें (५६) अशी श्लिष्ट रचना नारायणव्यासाने केली आहे. संतोषमुनि कृष्णदासाच्या 'रुक्मिनी-सैंवरा'तही (९·४१) 'उदयेभास्करू'चा उल्लेख आहे. संपादकांनी '**उदय-भास्करू (पु)-उगवता सूर्य**' असा अर्थ सांगून या **ओवीवर उजेड पाडला** आहे !

२) वैशाखमासातील शुद्ध द्वादशीला उषेचा प्रियकर तिला स्वप्नात भेटेल असा भवानीने आशी-र्वाद दिलेला आहे. त्या रात्री उषेने केलेल्या केश-वेषभूषेचे कवी वर्णन करतो--

प्रीयोलागि **एकसरा**।
म्हणौनि न वंधेचि **दुसरा**।... २६९

एकसरा (=१ एकदाणी, २ एकनिष्ठ) आणि दुसरा (=१ दोनपदरी हार, २ अन्य) या शब्दांनी कवी श्लेष साधतो हे संपादकांच्या ध्यानातच आलेले नाही. त्यांचा खुलासा कसा आहे पहा--

'एकसरा (अ)-अलंकारविशेष ?' एकसरा हे 'अ' म्हणजे अव्यय असेल तर अलंकारविशेष हा त्याचा अर्थ कसा होईल ? एकसरा हे अव्यय म्हटल्यानंतर प्रश्नचिन्हांकित का असेना पण अलंकारविशेष हा अर्थच सुचायला नको होता. 'दुसरा' या शब्दाचा तर त्यांनी विचारच केला नाही. 'दुसरा (वि)-४५' ही अन्य संदर्भाने केलेली नोंद त्यांना पुरेशी वाटली असावी.

उषेची आणि अनिरुद्धाची स्वप्नभेट जशी अद्-भुतरमणीय आणि मृदुमधुर तशीच उषेने घेतलेली ही काळजी कुसुमकोमल आणि नितांत प्रेममय आहे. चोंभाच्या श्रेष्ठ कवित्वाची येथे साक्ष पटते. तो आणखी सांगतो—

प्राणनाथाचां आंगीं।
खुपति कांकणाचीं **वेगीं**॥
म्हणौनि **कळाविया** ल्याली।
आईति पडे वेगोवेगीं ॥ २७० ॥

'वेग (पु)-आवेश, गती' हा संपादकांचा अर्थ येथे जुळत नाही. 'वेगीं' हा नपुसकलिंगी अनेकवचनी शब्द आहे डॉ. कोलते 'बेगीं' असा पाठ आपल्या लेखात सुचवतात. 'शिशुपालवधा'त 'बेग (न)' असा शब्द असला तरी त्याचे अनेकवचन 'बेगीं' होणार नाही. पण डॉ. कोलत्यांनी संदर्भ किंवा अर्थ दिला नसल्याने त्यांच्या सूचनेचा अधिक विचार करता येत नाही. 'कांकणाचीं वेगीं' प्राणनाथाच्या अंगाला खुपतील म्हणून उषा काकणाऐवजी 'कळा-विया' ल्याली आहे. काकणे खुपतात पण 'कळा-विया' खुपत नाहीत हा आशय स्पष्ट आहे. तेव्हा 'वेगीं' (एकवचन 'वेगें') चा अर्थ फिरक्या, कडा, जोड असा काही असावा. 'कळावीया' हा अलं-कारवाचक शब्द असल्याचे डॉ. कोलत्यांनी आपल्या लेखात म्हटले आहेच.

धाकुटपणिची आवडि चींती (चित्तीं ?)।
कांकणें **कळावीया** दोहीं हातिं।





बरवें (' वखे ' अशी छपाई) सलक्षणीक हात ।
तिखें नखें झळकति ।।१७१।।

या ओवीवरून ' कळावी ' हा हस्तालंकार आहे हे ध्यानात यायला अडचण नव्हती. पण संपादक म्हणतात, ' कळावी (पु) – **मनगटापासून कोपरापर्यंतचा भाग.**' आता दोन्ही हातात काकणांबरोवर ' मनगटापासून कोपरापर्यंतचे भाग ' कसे घालायचे? अशा वेळी **कोपरापासून नमस्कार ' घालून ' पुढे चलावे** हे बरे !

३) कवी श्रोत्यांच्या रुचिभिन्नतेचे दर्शन घडवीत आहे–

कवणा पढिए **अंबीळ** मधुर ।
कवणा पढिए तीखट क्षार ।।... २७६

मधुर, तिखट, क्षार यांप्रमाणे ' अंबीळ ' ही रुचिदर्शक विशेषण आहे. प्राकृतात ' अंबिल ' म्हणजे अंबट. तोच अर्थ येथे जमतो. संपादकांनी हा स्त्रीलिंगी शब्द आहे असे सांगून ' नाचणीचे पीठ आंबवून ताकात शिजवून केलेला पातळ पदार्थ ' वाचकांच्या पुढे ' रसास्वादा 'साठी ठेवला आहे !

४ ) स्वप्नातील मीलनानंतर उषा जागी झाली आहे–

स्वप्न सरलीया चेईली । मग गजवजोनि उठली ।
**घांगुसीता** आंथुरणी । तवं ते मंचकावरि एकली
॥ २९२ ॥

संपादकांच्या मते ' घांगुसणे ' म्हणजे ' **कूस बदलणे** '. स्वप्न सरले. उषा जागी झाली. गजवजून उठली. मग आता ' कूस बदलायची ' कशी ? खरे म्हणजे गजबजून उठलेल्या उषेवरील, त्या स्वप्निल वातावरणाचा प्रभाव अजून उणावलेला नाही. आपला प्रियकर जवळच असला पाहिजे असे तिला वाटते. साहजिकच अंथरुणावर ती शोध घेऊ लागते पण अरेरे ! तिला जाणवले की मंचकावर ती ' एकली 'च आहे. मग ती प्राणनाथाची काकुळतीने आळवणी करते, खांबालाच आलिंगन देते, पडते, उठते, दारात जाते, परत आत येते, हातात ' वाती ' घेऊन खांबा आड पहाते (२९३–२९६); असा तिचा संभ्रम चोंभाने चित्रित केला आहे. तेव्हा ' घांगुसणे ' म्हणजे ' शोध घेणे. ' याच अर्थाने ' घांधवसणे ' असे क्रियापद ज्ञानेश्वरीत ( ५–६७ ) आढळते.

५) एकटचा अनिरुद्धाने बाणाच्या दळाचा संहार केला पण तोही सर्वांगी खोचला गेला आहे–

जैसा **केसउ** फुलला । तैसा अशुद्धें वोंहळला ।
उदेजत असे सूर्यबींब । तैसा रणामाजि मीर्वला
॥ ६३१ ॥

रक्ताने न्हालेल्या अनिरुद्धाच्या वर्णनासाठी चोंभाने दोन उपमा वापरल्या आहेत. फुललेला ' केसउ ' आणि उगवते सूर्यबिंब ही दोन उपमाने आहेत. ' केसउ ' हा सं. किंशुक>प्रा. केसुअ या मार्गाने आलेला शब्द आहे. रक्ताने रंगलेल्या वीराला दिलेली फुललेल्या किंशुकांची (=पळसाची) उपमा प्राचीन साहित्याच्या अभ्यासकांच्या परिचयाची आहे. हाच प्रसंग निवेदिताना कृष्णयाज्ञवल्कीने अनिरुद्धाचे वर्णन ' तयांसि एकला झुंजत । तृणें वेष्टिला जैसा पर्वत । अशुद्धें फुलला दीसत । पळस जैसा ।। ४५ ।। (' कथाकल्पतरू ' स्तबक १ अ. ७) असे केले आहे. पण ' **केसउ (पु)–? गळू, फोड** ' हा संपादकीय **अर्थनिर्णयाचा नमुना पाहून डोसके गरगरायला लागते !** हा अर्थ पाहून ' आवाळु ' (१०९५, १४००) या शब्दाचा ' गळू ' असा संपादकांनी दिलेला अर्थ लक्षात येतो. तो अर्थही कसा चुकीचा आहे हे डॉ. कोलत्यांनी स्पष्ट केले आहे.

६) बाणाने पाठविलेले भाट आपल्याला भेटायला आले आहेत हे द्वारपाळाकडून कृष्णाला समजले—

हें आईकौनि श्रीकृष्णनाथु ।
भद्रासि आले सकळां यादवांसहीतु ।
तवं भाटी केला ब्रम्हावो ।
मग वाणिला बाणु दैत्यु ॥ ८५५ ॥
तवं बोलिलें श्रीअनंतें ।
**ठाकुरो** बिजें केलें केउतें ।
ते म्हणति योध्यसमंधें ।
तुम्हासि बोलाविलें बाणदैत्यें ।।८५६।।

' ठाकुर (पु) – **संदर्भाने–श्रीकृष्ण** ' ' संदर्भाने ' म्हणून संपादक असा खुलासा करीत असल्याने संदर्भ लक्षात येण्यासाठी एक ओवी अधिक उद्धृत केली आहे. ' तेव्हा श्रीअनंताने म्हटले, ' ठाकुरो ! कोठून आगमन केले ? ' ते ( भाट) म्हणतात, ' युद्ध-

संबंधाने तुम्हांला बाणदैत्याने बोलाविले आहे' असा ओ-८५६ चा अगदी सरळ अर्थ आहे. येथील संदर्भातच 'ठाकुरो' हे कृष्णाने भाटांना उद्देशून योजिलेले संबोधन आहे. म्हणून ठाकूर म्हणजे भाट(च), श्रीकृष्ण नव्हे. **संदर्भाने अर्थ सांगण्याची ऐट आणताना संदर्भच निसटावा** हा केवढा चमत्कार !

७) सैन्याच्या जमावाने पृथ्वी दाटली आहे. तिला आधार देणाऱ्या शेषकूर्मवराहांची त्रेधा उडाली आहे. कवी म्हणतो—

तेणें वळली कुर्मकवंटी।
शेषें पाए सुदले पोटी।
**आदिकोळे** केला धीरू।
म्हणौनि सां (सा) गरी जाय श्रृष्टी ।।९७०॥

येथे 'आदिकोळे' मधील प्रत्येक अक्षर सुटे छापले आहे पण पुढील ओवीत मात्र ती अक्षरे एक शब्द म्हणून छापली आहेत--

पृथ्वी घेउनि एकु।
गेला हिरण्याक्षु।
तैं स्मरलीयां पावला।
धरिला **आदिकोळाचा** वेखु ।।११४४॥

'कोल' म्हणजे वराह. या दोन्ही ओव्यांत विष्णूच्या 'आदिकोळ' म्हणजे 'आदिवराह' या अवताराचा निर्देश आहे. संपादकांना हे न कळल्याने 'आदिकोळ (साशपु)– **आद्य कुळ** ११४४' असे स्पष्टीकरण देऊन ते मोकळे होतात. 'आदिमीन' (१७२३), 'आदिकुर्मु' (११४३) अशा शब्दांवरून तरी 'आदिकोळ'चा पत्ता त्यांनी लावायला हवा होता. आपण कोणता अर्थ देतो हे त्या ओवीच्या संदर्भात ते बहुधा लक्षातच घेत नाहीत.'आद्यकुळाने धीर केला' (९७०), 'आद्यकुळाचा वेष धरला' (११४४) या वाक्यांना काही अर्थ आहे काय ?

८) बाणाच्या नगररक्षणाच्या व्यवस्थेची कवी कल्पना देत आहे—

सेलुनि हानावयाचेनि आवेशें।
तिखट टाकिले **घस**।
चरयांवरि कारलीं कैसीं।
**अंगीपाळे** रचिलीं बहुवसें ॥ १०७२॥

या आधीच्या ओवीत 'महाप्रचंडीं मगरबिबिया', 'दुतोंडी भैरवजंत्रें' इत्यादींचा निर्देश कवीने केला आहे. संपादक 'अंगीपाळ' हा नपुंसकलिंगी सामासिक शब्द असल्याचे सांगून त्याचा अर्थ '**अग्निकुंड**' असा देतात. 'अग्निकुंड' हे सारे कसे रचणार याचा त्यांनी विचारच केला नाही. अंगीपाळ हे सेनापतीसारख्या एखाद्या अधिकाऱ्याचे नाव असावे किंवा 'अग्निपाळ'चे ते उच्चारांतर असावे. 'अग्निपाळा'चा अर्थ मग तोफखान्यावरचा अधिकारी किंवा दारुगोळा, तोफा सोडणाऱ्या सैनिकांचा प्रमुख असा करता येईल असे वाटते. 'घस' पुल्लिंगी मानला पण त्याचा अर्थ मात्र 'अणकुचीदार' असा विशेषणासारखा दिला.

९) भागवत (स्कं. १० अ. ६२–६३), हरिवंश (विष्णुपर्व अ. ११६–१२८) आणि विष्णुपुराण (पंचम अंश अ. ३२–३३) यांत न आढळणारा एक प्रसंग चोंभाने रंगवला आहे. ज्योतिषाने राजदरबारात जाऊन दिनशुद्धी सांगण्याच्या चालीचा उपयोग चोंभाने योग्य ठिकाणी केला आहे. कृष्णाचे सैन्य बाणासुराच्या नगराजवळ आलेले आहे याची जाणीव जशी बाणासुराला नाही, तशीच त्याच्या ज्योतिष्यांनाही नाही. ज्योतिषशास्त्राच्या दृष्टीने त्या दिवसाचे स्वरूप व भविष्य ज्योतिष्यांनी बाणासुरास सांगितल्यानंतर लगेच प्रधान धावत येतो व सारंगधर आल्याचे घावऱ्याघाबऱ्या सांगतो. कृष्णाच्या या हल्ल्याची व बाणासुरावरील संकटाची ज्योतिष्यांच्या मुखातून कवीने दिलेली पूर्वसूचना त्याच्या कल्पकतेची साक्ष देणारी आहे.

'पातंडे' (पंचांग) सोडून ज्योतिषी बाणासुराला 'तीथिवार' श्रवण करवीत आहेत–

आजि मंगळवार दिवसु। बावन घटिका चतुर्दसु।
मंदु चौथा चंद्र। वृषभ राशी काळ **मोसु**
॥ ११२९ ॥
ऐसी दीनशुद्धि सांगतु। आजि **यौग व्याघातु**।
तवं तो उकरडा प्रधानु। देखा आला धांवतु
॥ ११३० ॥

हरिवंशाच्या ११६ व्या अध्यायात बाणाच्या ध्वजाचे पतन झाल्यानंतर 'स्वपक्षे चोदितः सूर्यो भरणीं समपीडयत्' (६१), 'वक्रमंगारकश्चक्रे कृत्तिकासु भयंकरः। बाणस्य जन्मनक्षत्रं भर्त्सयन्निव सर्वशः' (६६) असे कुयोगाचे व काही अपशकुनांचे वर्णन

अनुक्रमणिका








आहे पण तेथे ज्योतिषी नाहीत. चोंभाने त्यांची योजना केली आहे.

ज्योतिषशास्त्राच्या दृष्टीने चोंभाच्या या दिनशुद्धीचा आशय जाणून घेण्यासाठी येडूर (ता. चिक्कोडो, जि. बेळगाव) येथील ज्योतिषज्ञ श्री. ग. द. मोकाशी यांच्याकडे मी पृच्छा केली. त्यांच्या सविस्तर पत्रातील आशय सारांशरूपाने येथे देत आहे. "दिवस मंगळवार. त्याचा अधिपती मंगळ हा क्रूर ग्रह असल्याने या दिवसाचे फल साहसपूर्ण व कलह निर्माण करणारे आहे. चतुर्दशी बावन्न घटिका आहे म्हणजे दुसऱ्या दिवशीच्या पहाटेचे चार वाजेपर्यंत आहे. या दिवशी क्रोधवश होण्याची भीती असते. 'मंदु' म्हणजे शनि–मंगळाचे वैर असल्याने आणि दिनकुंडलित शनी चौथा येत असल्याने कौटुंबिक बाबतीत पराधीनता, राज्यभंग, शरीरपीडा यांचे भय सूचित होते. चंद्र वृषभराशीचा असून त्याला चौथा शनी म्हणजे सिंहराशीचा शनी होतो. यावेळी राज्याची उलथापालथ होण्याचा धोका असतो. वार व तिथी अशुभ. त्या दिवशी चंद्राला केंद्रीय शनी अशुभ झाला असून चंद्र-ग्रहसुद्धा वद्य चतुर्दशी असल्याने अमावास्येच्या तोंडावर आहे. त्यामुळे तोही बलहीन आहे. अशा परिस्थितीत चतुर्दशीला अगर अमावास्येला व्याघात योग येईल. तो काल दिनकुंडलीत फारच अशुभ होतो. रवी व चंद्र वृषभ राशीत वैशाख महिन्यातील चतुर्दशीला अथवा अमावास्येला असतात. व्याघात योग हा अशुभ कालच. अचानक हल्ला, घात, प्रतिकार करण्यास कठीण असे विनाशकारक संकट असा या योगाचा परिणाम आहे."

'मंदु (पु)—क्षीण, लहान' हा संपादकांनी दिलेला अर्थ पाहिला तर 'मंदु'च्या पुढे विशेषण म्हणून ('वि') अशी नोंद नको होती काय ? पण 'मंदु'चा अर्थ 'शनी' 'मोसु (पु) – सूचक चिन्ह' हा खुलासाही चुकीचा वाटतो. 'मोसु'चा संबंध संस्कृत 'मोष' (= चोर, प्रतिकूल) या शब्दाशी असावा. कन्नडमध्ये 'मोसु' म्हणजे फसवणूक. तेव्हा 'मोसु'चा अर्थ प्रतिकूल, फसवणारा असा असावा. 'व्याघात' या शब्दातच 'विशेष आघात' असल्याने तो एक कुयोग आहे हे स्पष्ट आहे. पण संपादक 'यौगव्याघातु' असा सामासिक शब्द मानून त्याचा, 'चंद्रसूर्यांच्या गतीच्या वेरजेतील प्रतिबंध' असा अर्थशून्य अर्थ देतात. 'गतीच्या बेरजेतील प्रतिबंध' म्हणजे काय ? त्यांनी दिलेला अर्थ आम्हांला समजला नसेल पण त्यांना तरी समजला आहे काय ?

या संदर्भात आणखी एका विशेषाचा विचार करावा असे वाटते. भवानीने उषेला दिलेला वर आणि अनिरुद्धाशी होणाऱ्या स्वप्नभेटीची वैशाख शुद्ध द्वादशी ही तिथी या दोन्ही भागवतात नाहीत. त्या हरिवंश व विष्णुपुराण यांत आहेत. चोंभाच्या चित्रणाप्रमाणे भवानीच्या वरानंतर लौकरच ही द्वादशी आली आहे. त्या दिवशी सकाळपासून विरह-बाधेने ती व्यथित झाली आहे. रात्री स्वप्नभेट होते. स्वप्नाच्या दुसऱ्या दिवशीच्या रात्रीच चित्ररेखेने अनिरुद्धाला आणले. इथपर्यंत घटना वेगाने घडतात. पण त्यानंतर 'भीतरी वीनोदें असतां । प्रेमप्रीती दीवस लोटले बहुत' (५४८), 'किती एक दीवस वरी। सखीयांसीं केली चोरी' (५४९), 'गुप्त होता बहुत दीवस (५५१) या उल्लेखांवरून अनिरुद्धाच्या आगमनापासून प्रगटीकरणापर्यंतचा काळ नेमका किती हे सांगता येणे कठीण आहे. पण

'नाना चोरिचेनि नावे ।
किती दीवस सीद्धी जाए' (५५२)

या कवीच्या प्रश्नावरून आणि—

अस्त्री–पुरुषां दोघां मेळु ।
माजि तीसरा तुडताळु ।
तयांमाजि जाला चौर्था ।
तरि मातु फांकतां न लगे वेळु ॥ ५५३॥

या त्याच्या विधानावरून हा काळ पंधरासोळा दिवसांपेक्षा अधिक नसावा असे दिसते. तसे असेल तर ज्योतिष्यांनी सांगितलेली 'चतुर्दसी' वैशाख-वद्यातील असावी असेही म्हणता येते. भागवत-पुराणात (१०.६३.१) अनिरुद्ध अदृश्य झाल्यापासून शोकाकुल झालेल्या यादवांचे पावसाळ्याचे चार महिने तसेच (म्हणजे अनिरुद्धाचा शोध न लागता) गेले असे म्हटलेले आहे. अनिरुद्धाचा शोध न लागता चार महिन्यांचा काळ लोटणे ही यादवांच्या दृष्टीने व पर्यायाने कृष्णाच्या बाबतीत कमीपणा आणणारी बाब आहे असे चोंभाला वाटले असण्याची शक्यता नाकारता येत नाही. म्हणून वरील 'चतुर्दसी' वैशाख

अनुक्रमणिका

वद्यातील असावी असे मानायला प्रत्यवाय नसावा.

१०) कृष्णाने बाणासुरावर हल्ला चढविला असल्याचे सांगण्यासाठी नारद कैलासास गेला आहे. त्यावेळी शिवाला उद्देशून तो म्हणतो,

चहुं **ग्रामांचा** प्रतिपाळकु ।
श्रृष्टीमाजि तुंची एकु ॥...१२६४

'ग्राम'चा गाव हा संपादकांनी दिलेला अर्थ दिशाभूल करणारा आहे. शंकर जर एखाद्या जहागीरदाराप्रमाणे चार गावांचा प्रतिपाळक असता तर नारदाने 'सृष्टीमध्ये तूच एक' असे म्हणायचे काय कारण होते? येथे ग्राम = भूतग्राम = भूतसमूह. जारज, अंडज, स्वेदज व उद्भिज्ज हे ते चार ग्राम होत. अशा 'चौं (चहुं) ग्रामांचा' उल्लेख १८२३, १८२४, १८२७ या ओव्यांतही आहे.

११) राउताचें शीर तुटें।
गाढें **आशन** न लोटे।
उभारिलें खर्ग न पडे।
वागारा हातिचा न सुटे ॥१४०८॥

लढाई चालू आहे. घोडेस्वाराचे मस्तक तुटले तरी त्याची मांड, बैठक ('आशन'= आसन) ढळली नाही, वर उचललेले खड्ग खाली पडले नाही की हातातील लगाम सुटला नाही, अशा त्या राउताचा कवी गौरव करीत आहे. पुढे ओ. १४१३ त, स्वार रणात पडल्याने घोडे भांबावले आहेत व 'सुना **आसनी** धांवति सैरा' असे कवी सांगत आहे. तेव्हा 'आश(स)न' म्हणजे घोडयावरील मांड, बैठक होय. पण संपादकांचा अर्थ आहे. '**धनुष्य**'. चोंभाच्या या वर्णनात घोडेस्वाराच्या (एका) हातात आहे 'खर्ग' आणि (दुसऱ्या) हातात आहे 'वागारा'. मग त्याने हे 'आशन' म्हणजे धनुष्य काय गळयात अडकवले होते?

१२ अ) भीमध्वज व अनिरुद्ध एकमेकाशी लढताहेत. भीमध्वजाची अवस्था—

जीव्हार चुकलें कडतरला ।
मुर्च्छागतु वीकळु गेला।
हातांपायांची **मुकुंडी** करौणी ।
रथावरी उलंडला॥ १४५१ ॥

आ) अनिरुद्ध सर्पांकडून वेढला गेला,

हातापायांची **मुकुंडी** ।
मग पाडिला धरणीवरी ॥ ७०२ ॥

इ) लोहोदंत व कार्तिकेय यांचे युद्ध चालू झाले. त्यावेळी स्वामी—

जीव्हार भेदौनि सकडतर जाला।
मुर्छा एउनि वीकळु पडीला ।
हातांपायांची **मुकुंडी** करौणी ।
रथावरी उलंडला ॥ १५३२ ॥

ई) सर्पांच्या भीतीनें यादवांच्या सैन्यातील—

सारथी महारथी ।
रथ सांडोणि पळति ।
हातांपायांच्या **मुकंडी** करौणी ।
भुमीवरि लोळति ॥ १८६५ ॥

या सर्व ठिकाणी 'हातापायांची (च्या) मुकुं (कं) डी' असे शब्द आहेत. त्यांचा अर्थ हातांपायांचा संकोच', 'वाकडेतिकडे पसरलेले हातपाय' असा आहे. त्यांच्या हातांपायांतील त्राण गेले असे कवीला म्हणायचे आहे. काही भित्रे 'मेलीयांआड दडति। करिति मावेचीया **मुकुंडी**' (१७६०). येथेही मुकुंडीचा अर्थ शरीरसंकोच हाच आहे. संपादकांनी 'मुरकुंडी, **मान वळविणे**' असा अर्थ दिला. आता हातापायांची मान कशी वळवायची?

१३) लाठें यादवांचें कुळ ।
कैसें मांडलें **हरमखळ** ।
केलें संधान अणोर्धे ।
वाणी भरलें अंत्राळ ॥ १४८० ॥

'हरमखळ' च्या जागी राजवाडेप्रतीचा पाठ आहे '**हरीमेषक**'. ओवी १६४९ त आलेल्या '**हरीमखळ**' नोंद संपादकांनी केलेली नाही. ही तिन्ही एकाच शब्दाची लेखनांतरे दिसतात. लीळाचरित्रातील एका लीळेच्या आधारे चर्चा करून डॉ. कोलत्यांनी आपल्या लेखात 'हरीमेखळ'चा 'दैवी चमत्कार, अपूर्व चमत्कार, असाच अर्थ दिसतो' असे म्हटले आहे. संपादकांनी दिलेला 'कारस्थान, हरामखोरी' हा अर्थ चोंभाला अभिप्रेत असता तर 'हें तवं शंभुचें हरीमखळ' (१६४९) असे त्याने म्हटले नसते. 'हरमखळ' हा शब्द 'हर' मखळ' असा न वाचता 'हरम'खळ' असा संपादकांनी वाचला असावा आणि म्हणून 'हरम = हराम, खळ = दुष्ट' असे काही काही अर्थतरंग मनात

उठत असता त्यांनी 'हरामखोरी' असा अर्थ दिलेला दिसतो. मात्र त्यांनी या शब्दाची सामासिक शब्द म्हणून नोंद कशी केली नाही याचे आश्चर्य वाटते. ज्ञानेश्वरीत (दांडेकर, साखरे इ. च्या प्रतींत १५.२४१) 'हरी मेखळे' असे सुटे शब्द छापलेले आढळतात. तेथे 'हरीमेखळे' असा एकच शब्द घ्यायला हवा. मु. ग. पानसे यांच्या 'Index Verborum of Jñāneśvarī' मध्ये 'हरिमेखल n. mirage ?–lem 15·24/c' अशी नोंद आहे. हा शब्द कन्नडमध्ये आहे असे कुठेतरी ऐकले किंवा वाचले होते, म्हणून श्री. शिवराम कारंथांच्या 'सिरिगन्नड-अर्थ-कोशा'चा आधार घेतला त्यात 'हरिमेखले' असा शब्द असून त्याचा अर्थ 'मायाविद्या, इंद्रजाल' असा दिला आहे. तो या सर्व ठिकाणी योग्य ठरतो.

१४) कार्तिकेय व प्रद्युम्न (=मदन) यांचे युद्ध चालले आहे. मदनाने मायाशस्त्र जपून बाण सोडला आणि त्या बाणापासून अनेक देवांगना उत्पन्न झाल्या. प्रसंग आला म्हणून वीररसाला बाजूला सारून 'रणीं अभिनव श्रुंगारू' कसा निर्माण झाला हे कवी सांगत आहे. मात्र श्रोते कोपतील म्हणून तो विस्तार करीत नाही. त्या देवांगनांकडून स्वामी त्रस्त झाला त्यावेळी

मनी विस्मो करी इंद्रावो ।
म्हणे पाहा पां नवलावो ॥
शडमुख कपटें भंगीला ('भगीलो' आहे)।
आंगीं न लगतां घावो ॥ १६४४ ॥
देखा स्वामी एव्हडा वीरु ।
रणी सांडौणी राहांवरु ॥
आंगीं **चीरटी** नाहीं गेली ।
नाही केला हातिएरु ॥ १६४५ ॥

येथे 'चीरटी'चा अर्थ आहे 'ओरखडा, जखम' असा. संपादक सांगतात 'साडी, फडके'!

१५) बाणासुर बलरामाला युद्धासाठी पाचारण करताना वर्मी लागेल असे बोलून चिडवतो. तेव्हा–

मग मानुसपण विसरलें बापा ।
तेथें प्रगटलें नीज रूप ॥
जालीया दोनि सहस्र भुजा ॥
सहस्र एकु **खटाटोप** ॥१७९२॥

बलराम हा शेषाचा अवतार. माणूसपण विसरून बलरामाने आपले मूळचे शेषाचे रूप प्रगट केले. येथे 'खटाटोप'च्या आधी एक सहस्र हे विशेषण आहे. शेषाला सहस्र फणा असल्याचा उल्लेख भागवतादी पुराणांत येतो. तेव्हा 'खटाटोप' म्हणजे 'फणा.' 'खटाटोप' हा शब्द 'फटाटोप' पासून आला असे म्हणतात. (पहा– महाराष्ट्र शब्दकोश, मराठी व्युत्पत्तिकोश महाराष्ट्र वाक्संप्रदायकोश इ.) काही असो, चोंभाने 'खटाटोप' हा शब्द येथे 'फणा' या अर्थानेच वापरला आहे यात संशय नाही. संपादक लिहितात, 'खटाटोप (पु)– अवडंबर ?' अर्थाविषयी संशय व्यक्त केला आहे, 'हेही नसे थोडके'!

१६) कृष्ण आणि शंकर यांची बाणाकडे पाहण्याची दृष्टी कशी होती ?

कोपा चढला सारंगधरु ।
बाणासि करील संहारु ॥
एरु भक्तकाजकैवारी ।
नेंदी तयाची **तांति** करुं ॥१८१६॥

राजेवाडेप्रतीत चौथा चरण 'तो नेदी **ताती** करुं ॥५५॥' असा आहे. राजवाडे-प्रतीतील आणखी एक ओवी अशी–

लाठा आइकिजे ईसाइन्यु वीरु ।
दुजा संभुचा अवतारु ॥
मानु गोसावींयां समानु ।
म्हणौनी न ये **ताती** करुं ॥७१॥

हीच ओवी गोपाळचावडीप्रतीत पुढीलप्रमाणे–

लाठा आईकीजे ईसान्यु वीरु ।
तरि तो शंभुचा अवतारु ।
मानिजे गोसांवियां सामान्यु ।
म्हणोनि तया **चींता** न ए करूं ॥११७०॥

७१ व ११७० या ओव्यांची तुलनात्मक पहाणी केली तर रा. प्रतीतील 'ताती'च्या जागी गो.प्रतीत 'चींता' असा पाठ आल्याचे आढळते. 'ताती' हा शब्द कठीण वाटल्याने हे पाठांतर निर्माण झाले असावे. त्यावरून 'ता (तां) ती' म्हणजे 'चिंता, काळजी' हा अर्थ निष्पन्न होतो. राजवाड्यांनी दिलेला 'ताप, इजा' हा अर्थ पूर्णांशाने पटत नाही. डॉ. पठाणांनी 'ताति (पु)– **धागा,** संदर्भाने-विनाश १८१६' अशी नोंद केली आहे. गो.प्रतीत 'तयाची तांति' असे असता हा शब्द स्त्रीलिंगी न म्हणता त्यांनी पुल्लिंगी का म्हणावा ? शिवाय 'धागा' हा





अनुक्रमणिका

अर्थ असलेल्या शब्दाचा संदर्भाने का होईना पण 'विनाश' असा अर्थ का व्हावा हे समजत नाही.

तो अप्रमय आगाध-चक्रवर्त्ती :
जे कव्हणाची न करी **ताती** ॥
तरी अनाथा नाथ हे श्रुती :
स्वयं का नीरोपीली ? १०३९

या 'मूर्तिप्रकाशा'तील ओवीतील 'ताती'चा 'चिंता' हाच अर्थ योग्य वाटतो. डॉ. कोलत्यांनी जवळजवळ राजवाड्यांप्रमाणेच 'ताप, बाधा' असा अर्थ तेथे दिला आहे. महाराष्ट्र शब्दकोशानेही राजवाड्यांचा अर्थ स्वीकारला आहे. मात्र 'ताती–चींता' या पाठभिन्नतेच्या संदर्भात याच काव्यग्रंथात घडलेला एक चमत्कृतिजनक प्रकार वाचकांच्या निदर्शनाला आणून दिला पाहिजे–रा. प्रत व गो. प्रत यांतील पुढील ओव्यांचे निरीक्षण केल्यास हा प्रकार लक्षात येईल.

रा. प्रत–सहश्राभरीयासी माझारी।
भुजा तुटलीया उरलीया च्यारी ॥
तेव्हळी न करी**ची ताती**।
थीरु जालें तीयें अवस्वरीं ॥ ३८॥
आधींची लक्ष्मिपती।
सुद्रसेणा नीरोपु आती ॥
चतुर्भुज तेतुले माझे।
म्हणौनु न करी ची **ताती** ॥३९॥

गो. प्रत–सहस्रभुजांमाझारी।
तोडुणि राखीलया च्यारी ॥
तेव्हेळीं न करी **चिंता ती**।
निवांतु राहिला ते अवश्वरी ॥२०१५॥
आधींचि लक्ष्मीपति।
सुद्रशणासि निरोपु देती ॥
चतुर्भुजा तितुकें माझें रूप।
तयाची न करावी **तांति** ॥२०१६॥

३८ व २०१५ या ओव्यांच्या तिसऱ्या चरणांत 'ची ताती' आणि 'चिंता ती' अशी जी पाठभिन्नता दिसते ती पदनिश्चितीच्या भिन्न धोरणामुळे असावी की काय अशी शंका येते. अर्थात 'चि' वर अनुस्वार नसता तर शंका येण्याचेही कारण नव्हते. 'चिंता' या अर्थाविषयी माझे पूर्ण समाधान झालेले नाही.

१७) शंकर व कृष्ण लढताहेत, एकमेकांच्या शस्त्रास्त्रांचा ते शस्त्रास्त्रांनीच नाश करीत आहेत. त्यावर चोंभा म्हणतो,

शस्त्रें शस्त्र वीलया गेलें।
तेजें तेज लोपलें ॥
बापु कर्ता आदिपुरुषु।
एक एकासि **सीर्जीलें** ॥ १८५७॥

संपादकांनी 'सीर्जिणे (क्रि)–परिहार करणे, निपटणे' असे म्हटले आहे. परंतु 'सीर्जिणे + सृजणे, उत्पन्न करणे' हा खुलासा पटावा. 'मग सीरजीला तो स्यारा' (१९४७), 'मग सीर्जिला उष्ण ज्वरू' (१९५३), 'मग सीरजिला पुरुषु असुरू (२००२) या स्थळींही 'उत्पन्न करणे' हाच अर्थ समुचित ठरतो.

१८) त्रिपुरारीने 'पन्नका शस्त्र' सोडले आणि कृष्णाने 'गरुडशस्त्र'. वीरांना युगांत आल्यासारखे वाटते. त्या वेळी

रथ सांडौणि सारथी
मार्गे पाहात पळति ॥
**कुमंडल** गेले गडबडौणी।
थोर एताति काकुलती ॥१८८४॥

रा. प्रतीतील ओवीत पाठांतरे आहेत 'कुमंडल'च्या जागी रा. पाठ 'कुंमडलीं' असा आहे. ('कुंमडलीं भरलें राण' असा तेथे तिसरा चरण आहे.) म्हणून त्यांनी 'कुड्मल (नरक) = कुमडल' असे स्पष्टीकरण दिले. गो. प्रतीच्या तिसऱ्या चरणात 'कुमंडल' हा पाठ योग्य वाटतो. 'कु' म्हणजे पृथ्वी म्हणून कुमंडल म्हणजे पृथ्वीमंडल. संपादकांनी अर्थ केला आहे '**दुष्ट मंडळ, कमंडलु**' साध्यासीध्या वाचकांनी असा अर्थ केला की त्याला अज्ञान म्हणतात आणि मातबर संशोधकांनी असा अर्थ दिला की त्याला विद्वत्ता म्हणावयाचे ! येथे 'दुष्ट मंडळ' कोणतेच नाही आणि 'कमंडलु' गडबडून गेला तरी काकुळतीला यायचे कारण नाही. राजवाड्यांनी 'कुंमडल'च्या जवळ 'कुड्मल' आणले म्हणून पठाणांनी 'कुमंडल'च्या नजीक कमंडलु आणून ठेवला ! राजवाड्यांचे समर्थन करणे शक्य आहे तसे पठाणांचे नाही. पण तोडीस तोड तर दिली !

१९) हरिहरांची झुंज संपली. पडले रण उठविले गेले. आता सारेजण बाणाच्या राजधानीकडे निघाले. म्हणून त्या नगरीतील इमारतींची रचना सांगताना कवी लिहितो—

वावन सोनयांचें **तकट ।**
ते घातले **भुजावंट ।**
अेवींधां मोतियांचा चुना ।
तयाची **सोवाळी** चोखट ॥ २१५६ ॥

' तकट ' म्हणजे पत्रा. संपादकांचे ' **भरजरी वस्त्र** ' नव्हे. ' भुजावंट ' पुढे संपादकांनी प्रश्नचिन्ह ठेवले आहे. महाराष्ट्र शब्दकोशात ' भुजवट–वटा ' (<भूर्जपत्र ?) असा ' कडीपाट ' या अर्थाचा शब्द दिलेला आहे. त्याचे हे उच्चारांतर दिसते.ओ. २१५५ तील जसा ' भारवंट ' तसा हा ' भुजावंट '. ' सोवाळी ' या नपुंसकलिंगी अनेकवचनी शब्दाचा अर्थ आहे खिडक्या. नरेंद्राचे ' रुक्मिणी–स्वयंवर ', भास्कराचे ' शिशुपाळवध ' या ग्रंथांत हा शब्द आलेला आहे. ' सोवाळी (स्त्री) –तेज, झळाळी ' हे संपादकीय स्पष्टीकरण अर्थातच चुकीचे आहे.

२०) तवं **वाधावनी** गुढीएसीं ।
पुढें गेले द्वारकेसी ।
वरातेची आईति कीजे ।
देवो एताति जैतेंसीं ॥ २२२५ ॥

' वाधावनी ' गुढी घेऊन सर्वां आधी द्वारकेस गेले आहेत. पुन्हा

लोक **वाधावनयांतें** पुसति ।
वार्ता सांगा पां निगुति ।
कवणा जैत कवणा हारी ।
जरि यौध्यामध्यें होतेती ॥ २२२७ ॥

लोकांनी या ' वाधावन्यां'ना जयापजयाची वार्ता विचारली आहे. यावरून ' वाधावनी ' हे मंगलवार्ता पोचविणारे दूत होत. हा पुल्लिंगी शब्द एकवचनात व अनेकवचनात वेगवेगळा असणार नाही. संपादक ' वाधावनी ( स्त्री )–लग्नात वर आल्याची सूचना, वर्धावा ' असे म्हणतात.

' अनंत–हस्तें ' ( साहाय्यकांची यादी पहावी ) डॉ. पठाणांनी ' देतां किती घेशिल दों करांनीं ' अशी माझी स्थिती झाली आहे. त्यांच्या औदार्याचा लाभ आणखीही मला किंवा इतरांना घेता येईल, पण विस्तार किती करायचा ? आता ' शुद्धिपत्रा ' विषयी काही लिहीत नाही.

## मराठवाडा विद्यापीठ आणि डॉ. पठाण यांना विनंती—

प्राचीन मराठी साहित्याकडे आधीच अभ्यासकांचे लक्ष कमी असते. तशात असले संपादित ग्रंथ त्यांच्यासमोर आले की एकंदर प्राचीन साहित्याच्या संशोधनाविषयीच प्रतिकूल उद्‌गार काढण्यास त्यांना संधी मिळणार. तसे होऊ नये या प्रखर इच्छेने व नाइलाजाने हा लेख लिहिला आहे. त्यातील कडकपणाकडे सहानुभूतीने पहावे आणि पुन्हा असे घडू नये म्हणून दक्षता घ्यावी.

मराठवाडा विद्यापीठाचा परिसर म्हणजे मराठीचे माहेरघर. सुदैवाने अनेक प्राचीन हस्तलिखिते मराठी विभागाने मिळविली आहेत. या पुढेही मिळविली जातील. प्राचीन मराठी साहित्याच्या संशोधन–संपादनाची सर्वाधिक जबाबदारी महाराष्ट्रातील या विद्यापीठावर आहे. मराठी विभाग आणि विशेषतः डॉ. पठाण यांनी अधिक जागरूक राहिले पाहिजे.

तरीही या संपादनाचे प्रायश्चित्त त्यांनी घेतलेच पाहिजे. प्रस्तुत ग्रंथ सध्या विक्रीस काढू नये. निदान ' अंतरंगा'ची काही पाने, ' उखाहरणा'तील विशेषनामांचे परिशिष्ट, शब्दसूची आणि शुद्धिपत्र हा भाग असलेली सध्याची पाने काढून टाकावीत. काही भाग पुन्हा लिहून काढावा, मूळ हस्तलिखित काळजीपूर्वक वाचून शुद्धिपत्र तयार करावे, परिशिष्ट आणि शब्दसूची निर्दोष तयार करावी, जरूर तर श्री. कानोले, पोहनेरकर, देवीसिंग चौहान यांसारख्या ज्येष्ठ व मान्यवर संशोधकांचे साहाय्य घ्यावे आणि हा भाग परत छापून घेऊन संहिताभागास जोडावा. संहिताही परत छापायला सांगणे म्हणजे सारा ग्रंथच नव्याने छापायला सांगितल्यासारखे होईल म्हणून तशी विनंती करीत नाही. **अशा प्रायश्चित्ताने विद्वत्ता उजळून निघेल.**

प्रभाकर पाध्ये

# आत्मसंदेहाची बाधा न झालेले सोज्वळ व्यक्तित्व :



# जयप्रकाश नारायण

लोकनायक जयप्रकाश नारायण यांच्या जीवनात अशी काही स्थित्यंतरे घडली, असे काही अकल्पित प्रसंग उभे राहिले, अग्निदिव्याचे आव्हान देणाऱ्या अशा काही घटना घडल्या, की या संवेदनाशील पुरुषाला आत्मसंदेहाची बाधा कधी झाली नाही का असा प्रश्न मनात उभा राहतो.

'आत्मसंदेह' म्हणजे ज्याला इंग्रजीत 'आयडेंटिटी-क्रायसिस' म्हणतात ती अवस्था. आत्मसंदेहाने माणसाच्या एकसंध व्यक्तित्वालाच धोका निर्माण होतो. आत्मसंदेह झालेल्या माणसापुढे प्रश्न उभा ठाकतो तो हा की, मी खरोखर कोण आहे. असा माणूस स्वत:लाच ओळखेनासा होतो. त्याच्या संभ्रमित अहम्‌ला असे प्रश्न पडतात की, मी खरोखर एक व्यक्ती आहे की दोन ? माझे जगाशी, समाजाशी, स्वत:शी खरोखर नाते काय आहे ?

अशा आत्मसंदेहाचे एक नि:शंक उदाहरण पं. नेहरूंनी पुरविलेले आहे. आत्मचरित्रात एके ठिकाणी स्वत:लाच ते विचारतात की, मी येथला की पाश्चात्य जगातला ? माझे आंतरिक नाते भारताशी की पश्चिमेशी ?

जवाहरलाल नेहरूंचे पूर्वायुष्य पश्चिमी संस्कारात गेले. त्यांचे शिक्षक इंग्रज होते. बालवयातच ते शिक्षणासाठीं विलायतेस गेले ते केंब्रिजची पदवी घेऊन व बॅरिस्टर होऊनच परत आले. अनेक वरिष्ठ-वर्गीयांप्रमाणे त्यांनी आपले जीवन सर्वसाधारण भारतीयापासून अलिप्त असे पाश्चात्य वर्तुळातच व्यतीत केले असते, तर त्यांना असा प्रश्न पडला नसता. पण ते राष्ट्रीय चळवळीत उतरले आणि सर्वसाधारण भारतीयाच्या भवितव्याचा विचार करू लागले. तेव्हा त्यांना असा प्रश्न पडणे अपरिहार्य होते.

अर्थात येथे एक गोष्ट ध्यानात ठेवली पाहिजे. प्रत्येकाला हा प्रश्न पडतो असे नाही. आपल्यापैकी प्रत्येकाच्या जीवनात पेचप्रसंग– आपल्या आत्म्याला आव्हान देतील असे पेचप्रसंग– निर्माण होत असतात. पण आपल्यापैकी प्रत्येकजण नेहरूंसारखा संवेदनाशील नसतो. आत्मसंदेहाची बाधा होण्यासाठी प्रथम थोडे विकसित व्यक्तित्व असावे लागते. दुसरी गोष्ट म्हणजे व्यक्तित्वाला आव्हान देणारे प्रसंग निर्माण होण्यासारखे जीवन पत्करलेले असावे लागते. प्रचंड आव्हाने आणि विलक्षण संवेदनाशीलत्व यांची गाठ पडावी लागते. नुसते संवेदनाशीलत्वच नाही तर आत्मशोध घेण्याची ताकद आणि सवय असलेले व्यक्तित्व लागते. अशा व्यक्तित्वालाच आत्मसंदेहाची बाधा होण्याचा संभव असतो. शिवाय आयुष्यातला प्रत्येक पेचप्रसंग म्हणजे आत्मसंदेहाला निमंत्रण अशी परिस्थिती नसते.

× × ×

आपण जयप्रकाशांचे उदाहरण घेऊनच बोलू या. त्यांच्या आयुष्यात अनेक पेचप्रसंग उद्‌भवले. पेचप्रसंगांना निमंत्रण करणारे जीवनच त्यांनी स्वीकारले होते. पण प्रत्येक पेचप्रसंगाच्या समयी आत्मसंदेहाचा ज्वालामुखी जागृत झाला असे नाही. तसा तो जागृत होण्याचे कारणच नव्हते. उदाहरणार्थ, १९२९ साली ते अमेरिकेतले शिक्षण आटपून भारतात परत आले आणि लगेच राष्ट्रीय चळवळीत सामील झाले हीच गोष्ट घ्या. अमेरिकेत त्यांनी पाश्चात्य संस्कार पचविले होते. तसे जीवन हातावर सहज झेलता

अनुक्रमणिका







येईल असा अनुभव आणि शिक्षण संपादन केले होते. पण अमेरिकेला जाण्यापूर्वीच गांधीजींच्या असहकार आंदोलनात त्यांनी भाग घेतलेला होता. त्यासाठी त्यांनी कॉलेज सोडलेले होते, आणि चळवळ ओसरल्यानंतर परत कॉलेजात जाण्याऐवजी शिक्षणासाठी ते अमेरिकेला गेले होते. म्हणजे गांधीजींच्या राष्ट्रीय चळवळीशी त्यांची नाळच बांधलेली होती.

पण अमेरिकेत ते कम्युनिस्ट बनले आणि १९३० –३२ च्या कायदेभंगाच्या चळवळीला आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीचा विरोधच होता. कॉमिण्टर्नचे आदेश शिरसावंद्य मानून भारतीय कम्युनिस्टांनी कायदेभंगाच्या चळवळीला प्राणपणाने विरोध चालविला होता. ते गांधीजींना ब्रिटिश साम्राज्यशाहीचे हस्तक (एजंट) म्हणत. साम्राज्यशाहीला सामील झालेल्या देशी भांडवलशाहीचे गांधी प्रतिनिधी होते अशी त्यांची मीमांसा होती आणि तरी गांधीजींच्या चळवळीत उडी घेण्याची अंत:स्फूर्ती जयप्रकाशांना झाली. येथे, आपण कोण, कम्युनिस्ट की राष्ट्रवादी, असा प्रश्न जयप्रकाशांच्या मनात उत्पन्न होऊ शकला असता. अर्थात त्याला अगदी आत्मसंदेहाचे रूप प्राप्त झाले असते असे नाही पण जे. पीं. च्या बाबतीत असा काही निर्वाणीचा प्रश्न निर्माण होण्याचे मुळातच कारण नव्हते. कम्युनिस्ट की राष्ट्रवादी या प्रश्नाचे उत्तर लेनिनने अगोदरच देऊन ठेवलेले होते. मार्क्सवादाचे जे विकसन लेनिनने केले होते त्याचा एक भाग असा होता की, भांडवलशाहीला आंतरराष्ट्रीय साम्राज्यशाहीचे स्वरूप प्राप्त झालेले असतानाच्या काळात कम्युनिस्टांनी राष्ट्रवादाला पाठिंबा द्यायला हवा असा त्याचा आदेशच होता आणि स्टालिनच्या नेतृत्वाखाली भारतीय कम्युनिस्ट लेनिनच्या शिकवणुकीशीच खरोखर द्रोह करीत होते. म्हणजे आत्मसंदेहाऐवजी आत्मपूर्तीचा अनुभवच जयप्रकाशांना आला असेल.

पुढे समाजवादी पक्षात, जयप्रकाशांच्या आग्रहामुळे, कम्युनिस्टांना प्रवेश मिळाला, आणि त्यांनी आपल्या पक्षफोडीच्या ब्रीदाला जागून समाजवादी पक्ष आतून पोखरण्यास सुरवात केली. कम्युनिस्टांच्या या विश्वासघातामुळे जयप्रकाशांना अतिशय वेदना झाल्या. या घटनेचे व्रण त्यांच्या अंत:करणावर फार काल टिकले. पण तरी आत्मसंदेहाचा धोका निर्माण होण्याचे कारण नव्हते. जयप्रकाशांच्या मार्क्सवादी निष्ठेला तडा जाण्याचे कारण नव्हते. मार्क्सवादाचे संस्कार इतके खोल असतात, की मार्क्सवादाविषयीचा भ्रमनिरास हे एक आत्मिक युद्धच असते. पण भारतीय कम्युनिस्टच भ्रष्ट बनलेले आहेत असा सरळ निष्कर्ष जयप्रकाश काढू शकत होते.

मात्र १९४१ साली जयप्रकाशांनी देवळीच्या तुरुंगातून भेटायला आलेल्या प्रभावतीजींबरोबर आपल्या सहकाऱ्यांसाठी चोरून पत्र पाठविण्याचा जो अयशस्वी प्रयत्न केला तो प्रसंग वेगळा होता. अश्राप प्रभावतीजींना आपण यात अकारण गोवले आणि त्यांच्या गांधीवादी निष्ठेशी आपण विनाकारण खेळलो असा मनस्ताप जे.पीं. ना जरूर झाला असेल, पण येथेही आपण आपल्या आत्म्याशी प्रतारणा केली अशा वेदना त्यांना होण्याचे कारण नव्हते. साम्राज्यवादी सरकारशी लढताना आपण गांधीवादी नीतीचा अवलंब केला पाहिजे असे त्यांना मनापासून वाटत नव्हते. साधनशुचितेचा स्वीकार त्यांनी केला तो नंतर–स्वातंत्र्यप्राप्तीनंतर.

× × ×

समाजवादी पक्षातही काही विलक्षण प्रसंग जे.पीं. वर ओढवले. समाजवादी पक्ष हा एका सर्वश्रेष्ठ नेत्याचा पक्ष नव्हता. जयप्रकाशांबरोबरीने डॉ. लोहिया, अच्युतराव पटवर्धन, नरेन्द्र देव असे थोर थोर पुढारी त्या पक्षात होते. यांपैकी प्रत्येकाला त्याची स्वत:ची अशी प्रतिष्ठा होती. डॉ. नरेन्द्र देव हे थोर विद्वान आणि टिळकांच्या काळापासून राष्ट्रीय चळवळीत त्यागपूर्ण भाग घेत असलेले. अच्युतराव पटवर्धनांची सजाजातली प्रतिष्ठा सोडली तरी ते स्वत: मोठे बुद्धिवान, विद्वान आणि आकर्षक संस्कारित व्यक्तिमत्त्वाचे होते. डॉ. लोहिया हे एक प्रतिभाशाली विचारवंत तर होतेच, पण जागतिक राजकारणाचे खास विशारद होते. या सर्वांच्या विचारविनिमयाने पक्षाचे धोरण ठरे. काँग्रेसमध्ये महात्मा गांधी होते तसे सर्वोच्च नेतृत्व यांपैकी कोणालाच तेव्हा लाभलेले नव्हते. आणि ही सारी व्यक्तित्वे गतिमान आणि स्वयंप्रज्ञ असल्याने त्यांच्यात मतभेद अपरिहार्य असत. अशा परिस्थितीत श्री.

अनुक्रमणिका

अच्युतराव पटवर्धन यांनी, १९५१ साली, राजकारण संन्याशाचा निर्णय घेतला. त्याचे जयप्रकाशांना अतिशय दुःख झाले. समाजवादी पक्ष आपल्याला वापरीत आहे, अशी भावना झाल्यामुळे अच्युतरावांनी पक्ष सोडला अशी जयप्रकाशांची समजूत झाली होती, आणि हा प्रश्न त्यांच्या डोक्याला इतका त्रास देत होता की माझी-त्यांची खरोखर नुकतीच ओळख झालेली असून आणि मी बाहेरचा असूनही त्यांनी आपली व्यथा मला एकदा बोलून दाखविली होती. आता अच्युतरावांनी राजकारण सोडले ते एका आंतरिक प्रेरणेने. याचा पुरावा त्यांच्या नंतरच्या जीवनक्रमानेच मिळतो. कसल्याही अधिकाराचा, विद्यापीठाच्या उपकुलगुरुपदाचाही स्वीकार त्यांनी केला नाही. तरी जयप्रकाशांची, अच्युतरावांच्या राजकारणसंन्यासाबद्दल तशी समजूत झाली होती. पण त्याबद्दल त्यांच्या सदसद्विवेक-बुद्धीला वेदना होण्याचे सुतराम कारण नव्हते. कोणाला कधी 'वापरावे' असे वर्तन त्यांचे कधी झालेच नव्हते– जन्मात कधी झालेच नाही. व्यक्तीला 'वापरण्या'च्या कल्पनेला विरोध असणाऱ्या काण्टचा आदेश रक्तात भिनवूनच जणू ते जन्माला आले ! तेव्हा अच्युतरावांच्या राजकारणसंन्यासाने त्यांच्या आत्म्याला आव्हान मिळण्याचे कारणच नव्हते. (या दृष्टीने जे. पी.–अच्युतराव यांची अखेरची भेट हे एक नियतीचे विलसितच वाटते. अच्युतराव हे जयप्रकाशांना भेटायला आलेले अखेरचे अभ्यागत होते. )

समाजवादी पक्षातल्या डॉ. लोहियांसारख्या नेत्यांची नीती आणि प्रकृती अशी होती की जयप्रकाशांवर आघात करण्यास जणू ते उत्सुकच असत. लोहियाप्रभृती चारपाच नेते, सर्वसाधारणपणे एकाच श्रेणीचे होते. पण जयप्रकाशांना १९४२ च्या आंदोलनात जी प्रतिष्ठा आणि मान्यता मिळाली ती एवढी जबरदस्त होती की समाजवादी पक्षाच्या काही नेत्यांना तरी त्यांचा मत्सर वाटायला लागला होता, यांत शंका नाही. याचा मला स्वतःला आलेला एक अनुभव सांगतो. ऑगस्ट–आंदोलनाच्या कालात, युरोपात हिटलरविरोधी युद्ध निकराने पेटलेले असताना, यांपैकी एका नेत्याने, हिटलर ज्या 'मिथ्स' (म्हणजे राष्ट्राच्या आत्म्याचा कबजा घेणाऱ्या कथा अगर प्रतीके ) निर्माण करीत असे त्यांच्यावर एक आकर्षक भाष्य करून या 'मिथ्स'च्या प्रभावशालित्वाची मीमांसा मजपाशी केली, आणि म्हटले, "जयप्रकाश हे असे एक 'मिथ्' आम्ही निर्माण केलेले आहे." (म्हणजे जयप्रकाशांचा मोठेपणा खरोखर मानीवच आहे, पण आम्ही तो आंदोलनाच्या उद्दिष्टासाठी बुद्ध्याच निर्माण केलेला आहे.) या मत्सरी नेत्यांचा जयप्रकाशांवर अगदी पोटातून राग होता. आणि त्याचा भडका कधी अचानक होई. धोरणविषयक चर्चेने त्याला चांगली संधी मिळे. बेतूलच्या समाजवादी अधिवेशनात जयप्रकाशांवर अशी अघोरी टीका करण्यात आली होती, की तिने व्यथित झाल्यामुळे त्यांनी मंडपाच्या मागे जाऊन अश्रू ढाळले होते. पण तरी आत्मसंदेहाचा प्रसंग ओढवलाच नाही. कारण एकतर ही टीका मत्सरी आहे हे अनेकांच्या ध्यानात येत होते आणि दुसरी गोष्ट म्हणजे पक्षाचे कार्य करताना आत्मा निर्लेप राखणे, त्याला वैयक्तिक महत्त्वाकांक्षेचा स्पर्श होऊ न देणे हा जयप्रकाशांचा स्वभाव बनला होता. (यासंबंधीची एक आठवण सांगतो. भावी पंतप्रधान म्हणून जयप्रकाशांची मनधरणी करण्याचे प्रयत्न अनेक भांडवलवाले करीत. अशा एका भांडवलवाल्याच्या घरी जे. पी भोजनासाठी गेलेले असताना जे. पीं. चा अनुनय करण्याचे अनेक प्रकार चालले होते, पण जे. पी. स्वतः अगदी अलिप्त होते. त्या प्रसंगी हजर असलेल्या एका ऑस्ट्रियन महिलेने हा स्वानुभव मला, १९५१ साली कौतुकाने कथन केला होता.) या विशिष्ट अलिप्त वृत्तीमुळे, पक्षात त्यांच्यावर जी अनुचित– अनुदार टीका अनेकदा होई तिने त्यांच्या अंतःकरणाला घरे पडलीच नाहीत.

१९५२ च्या निवडणुकांत समाजवादी पक्षाने सत्ता हस्तगत करण्याच्या जिद्दीनेच भाग घेतला होता. (त्या जिद्दीला वस्तुस्थितीचा फारसा आधार नव्हता ही गोष्ट सोडा. ) पण या निवडणुकीत जयप्रकाश स्वतः उभे राहिले नव्हते हे ध्यानात धरायला हवे. १९५३ साली ( ५२ च्या निवडणुकीत फज्जा उडालेला असूनही) नेहरूंनी समाजवादी पक्षाला सरकारात सामील होण्यासाठी पाचारण केले. त्यावेळी झालेल्या वाटाघाटीत जयप्रकाशांनी प्रमुख भाग घेतला.

मात्र बोलणी यशस्वी झाली तरी आपण सत्तास्वीकार करायचा नाही असा जयप्रकाशांचा पक्का निर्धार होता. (तेव्हा आदल्याच वर्षी ज्याचा भांडवली मनोवृत्तीचे सरकार म्हणून आपण सक्त निषेध केला त्या सरकारात सामील होताना—आपण कोण, समाजवादी की भांडवलवादी असा सवाल त्यांच्या अंतरंगात उठण्याचे कारणच नव्हते. नेहरूंना समाजवादी पक्षाबद्दल अगत्य नव्हते, त्यांना जयप्रकाश सरकारात हवे होते. जयप्रकाशांच्या अंतस्थ निर्धाराचा सुगावा त्यांना लागला त्याक्षणीच या वाटाघाटींचा निकाल लागला ! )

× × ×

जयप्रकाशांच्या गांधीवादी जीवनात अनेक पेचप्रसंग निर्माण झाले, पण त्यांनी प्रत्येक वेळी त्यांचा आत्मा ढवळून काढला असे नाही. जीवनदानाचाच प्रसंग घ्या. हा एक अपूप प्रसंग होता. जयप्रकाश आपले उभे आयुष्य, आजवरच्या त्यांच्या तत्त्वज्ञानाच्या विरोधी काटकोनात उभ्या असलेल्या तत्त्वज्ञानास आणि जीवनधारणेस वाहून घ्यायला निघाले होते. एके काळच्या कम्युनिस्टाचे आणि अलीकडेपर्यंत भौतिकवादी जीवनधारणेचा तत्त्वनिष्ठ पुरस्कार करणाऱ्या व्यक्तीचे हे जीवनदान होते. पण येथे आत्मसंदेहाचा प्रश्न उद्‌भवत नव्हता. समाजवाद ते गांधीवाद हे तात्त्विक सीमोल्लंघन त्यांनी अगोदरच केलेले होते, आणि १९५२ च्या उपोषण—कालात त्यांना नैतिकतेचा साक्षात्कारच झालेला होता. येथे मी कोण, माझे स्वत्व खरोखर कोणते हा प्रश्न उठण्याचे कारणच नव्हते. जी क्षितिजे त्यांच्या नजरेला दिसत होती त्यांच्यावर त्यांच्या पूर्वील जीवनाच्या पडच्छाया पडलेल्याच नव्हत्या.

गांधीवादी जीवनात जयप्रकाशांना खरोखर अनेक दिव्यांना तोंड द्यावे लागले, पण प्रत्येक वेळी आत्मसंदेहाचा सवाल उठण्याची गरज नव्हती. बिहारमधील भूदानच, उदाहरणार्थ, पाहा. भूदानाच्या क्रांतिकारक शक्तीच्या शक्यता त्यांना भावलेल्या होत्या. पण प्रत्यक्षात त्या एकेक फोल ठरत होत्या. हजारो एकर जमिनीचे दान झाले—म्हणजे दानपत्रे मिळाली. पण भूदान फसत होते, नव्हे तो फसवाफसवीचाच कारभार ठरत होता. पदरात पडलेल्या जमिनी दरिद्री होत्या. दिलेली आश्वासने अधांतरी टांगली जात होती. त्यांच्या परिपूर्तीची चिन्हे उगवतच नव्हती. आश्वासनांचा भंग करणाऱ्यांविरुद्ध सत्याग्रह करावा ही गांधीवादी नीती जयप्रकाशांना भावत होती, पण विनोबांना भावत नव्हती. त्याचा गांधीवाद अनपेक्षित सोवळी रूपे धारण करीत होता. आणि तरी जयप्रकाशांचा भ्रमनिरास झाला नाही. कारण भूदानाभोवती ग्रामस्वराज्याचे जे स्वप्न निर्माण झाले होते ते त्यांच्या नजरेवर तरळत होते.

महात्मा गांधींच्या प्रेरक नेतृत्वाखाली जयप्रकाश गांधीवादी झाले असते तर ? गांधीवादात जी कृतिशीलता होती तिचा मोठा विकसनशील आविष्कार त्यांनी केला असता आणि गांधींचा त्याला आशीर्वाद मिळाला असता. पण विनोबांची गोष्ट निराळी होती. त्यांचा दृष्टिकोनच निराळा होता, अधिक अध्यात्मिक होता. मानवपरिवर्तनाचेच स्वप्न ते पाहत होते. या स्वप्नाचा वस्तुस्थितीशी मेळ बसत नव्हता, पण विनोबांची दृष्टी वस्तुस्थितीवर नव्हतीच. अशा या विनोबांसमोर जयप्रकाशांनी जीवनदानाचे अर्घ्य दिलेले होते. पण याहूनही महत्त्वाची गोष्ट म्हणजे जे. पीं. च्या जीवनावर आंतरिक प्रभाव पाडून असलेल्या प्रभावतीजींची विनोबांवर विलक्षण निष्ठा होती. आणखी असे, की भूदानाच्या प्रश्नावर सत्याग्रह हा एक जबरदस्त प्रश्न असला तरी त्या बाबतीत जयप्रकाशांना त्यांच्या गांधीवादी सहकाऱ्यांची साथ कितपत लाभली असती हा प्रश्नच होता. आतापर्यंत या बहुतेक सहकाऱ्यांचे बरेचसे विनोबाकरण झालेले होते. पण अर्थात प्रभावतीजींच्या भावनांचा प्रभाव हा सर्वाधिक महत्त्वाचा मुद्दा होता. तेव्हा एवढ्या मोठ्या क्रांतिकारक महत्त्वाच्या प्रश्नावर जयप्रकाशांची आंतरिक घालमेल होत असली तरी आत्मसंदेहाचा सवाल उठण्याचा प्रश्नच निर्माण झाला नाही.

१९७० मधले मुसहरीचे आव्हान हे असेच एक आत्यंतिक प्रकरण होते. हे प्रकरण निर्माण झाले तेव्हा जयप्रकाशांना शारीरिक स्वास्थ्य नव्हते. अनेक वर्षांच्या दगदगीने त्यांचे शरीर थकलेले होते. मित्रांच्या आग्रहावरून ते पौडीला जाऊन विश्रांती

अनुक्रमणिका

घेत होते. इतक्यात विनाशाचे व्रत घेतलेल्या नक्षलवाद्यांचा मोहरा त्यांच्या कार्यक्षेत्राकडे वळला. काही जमीनदारांचे आणि त्यांच्या गुमास्त्यांचे खून वगैरे पाडल्यानंतर नक्षलवाद्यांनी मुझफरपूरच्या जिल्हा सर्वोदय मंडळाचे अध्यक्ष बद्रिनारायण आणि कार्यवाह गोपाळ मिश्र यांना ठार मारण्याची धमकी दिली. ता. ३१ मे रोजी जे. पीं.ना ही गोष्ट कळली आणि लगेच ते मुसहरीला आले. तेथे ते सहा महिने राहिले. त्यांच्या तेथल्या अस्तित्वानेच नक्षलवाद्यांची धमकी जिरली, पण ती जिरली नसती तरी आत्मसंदेहाचा प्रश्न उभा राहण्याचे कारणच नव्हते. चंबल खोऱ्यांतील डाकूंचे हृदयपरिवर्तन करणाऱ्याला हिंसेचे जे दर्शन होते ते सर्वसाधारण नसते. या दृष्टीतच हिंसेचा निचरा करणारी द्रव्ये असतात. तेव्हा नक्षलवाद्यांच्या हिंसेच्या धमकीने जयप्रकाश अस्वस्थ होण्याचा संभव नव्हता. पण या निमित्ताने त्यांनी जो अभ्यास आणि निरीक्षण केले त्यातून झालेले वस्तुस्थितीचे दर्शन हादरविणारे होते. एका बाजूला भूदानाच्या शोककथेचा त्यांना साक्षात अनुभव होता– आणि दुसऱ्या बाजूला वास्तवाचे विश्वरूपदर्शन भयंकर होते. त्यांनी स्वच्छ लिहिलेच की, "या हिंसेची आणि अत्याचाराची जबाबदारी नक्षलवाद्यांवर मूलतः नाही, तर जे राजकारणी, अधिकारी, जमीनदार आणि सावकार, सारे कायदे धाब्यावर बसवून. गरीबांना प्राथमिक न्याय देण्यास नकार देतात त्यांच्या डोक्यावर या हिंसाचाराचे खापर फोडायला हवे." इतर गांधीवाद्यांनी असा आवाज फारसा कधी उठवला नाही, कारण त्यांना अंत:करण असले तरी दृष्टी नव्हती. जयप्रकाश गांधीवादाकडे आले ते आपली समाजवादी ध्येयधारणा विसरून आलेले नव्हते, तर तिचे सर्जनशील विकसन करण्यासाठी आलेले होते. वास्तवाच्या विश्वदर्शनातूनच त्यांना समाजवादाची दीक्षा मिळालेली होती, आणि आज इतक्या परिवर्तनानंतरसुद्धा, दारिद्र्याशी मुकाबला करण्यासाठी तळहातावर शीर घेऊन सिद्ध झालेल्या नक्षलवाद्यांबद्दल त्यांना आकर्षण नाही तरी आदर वाटणे अपरिहार्य होते. नक्षलवाद्यांशी लढताना आपण एखाद्या शत्रूशी लढत आहोत अशी त्यांची भावना होणे मुळातच शक्य नव्हते. आणि हा विशिष्ट लढा तर जयप्रकाशांना प्राणप्रिय असलेल्या गोष्टीबाबतचा लढा होता. एक प्रकारे तो आत्मपूर्तीचा लढा होता–जसा तो एका अनाकलनीय पातळीवर चंबळ खोऱ्यातील डाकूंच्या हृदयपरिवर्तनाचा लढा होता. ते नक्षलवादी आणि हे डाकू ही दोन परस्परविरोधी टोके होती– पण अंतिमतः ती एकाच सामाजिक समस्येची टोके होती.

× × ×

जयप्रकाशांची सत्त्वपरीक्षा पाहणारा एक प्रसंग– एक अगदी अकारण प्रसंग–१९५८ साली, जे. पी. यूरोपच्या दौऱ्यावर असताना उद्‌भवला. इकडे नेहरूंनी अशी इच्छा व्यक्त केली की आपल्याला काही काल सत्तेपासून दूर व्हायचे आहे. झाले ! 'नेहरूंनंतर कोण ?' या वारंवार कुजबुजल्या जाणाऱ्या प्रश्नाला जाहीर वाचा फुटली. या प्रश्नाची चर्चा होऊ लागली. ती चालू असतानाच, नेहरूंनी आपली सत्तात्यागाची इच्छा थोडी अधिक निश्चितपणे व्यक्त केली. जयप्रकाश सत्तेपासून नेहमीच दूर असत. पण वर्तमानपत्रकारांनी त्यांचे नाव 'दिल्लीच्या तख्ता'शी जोडण्यास जोराने सुरवात केली. अखेरीस 'मँचेस्टर गार्डियन'च्या वार्ताहरापाशी जे. पी. म्हणाले की, "आणीबाणीत आपले वर्तन काय असेल हे सांगणे तसे कठीणच असते. पण जर अशी विलक्षण परिस्थिती ओढवलीच, आणि मी सरकारात सामील व्हावे अशी लोकांची इच्छा असलीच तर पुनः राजकारणात शिरण्यास आपण अनमान करणार नाही. तरीपण एक गोष्ट नक्की की मी कोणत्याही राजकीय पक्षाचा सभासद होणार नाही." हे उद्‌गार आपण का काढले हे त्यांचे त्यांनाच नीटसे सांगता आले नसते, कारण आजवर ते कटाक्षाने सत्तेपासून दूर राहिले होते. पण त्यांनी हे उद्‌गार काढले आणि 'जे. पी. राष्ट्राचे नेतृत्व स्वीकारणार', 'द गॉलचा भारतीय अवतार' असे मथळे वृत्तपत्रांच्या पृष्ठभागावर नाचू लागले !

या परिस्थितीत आपण कोण, आपली वास्तविक भूमिका कोणती, आपण राजनीतीचे की लोकनीतीचे असा गंभीर सवाल उठणे अपरिहार्यच होते. पण असे काही झाले नाही. व्हायचे कारण नव्हते. कारण नेहरू स्वतः होऊन, दिल्लीला सत्तेची पोकळी

निर्माण करतील असे संभवतच नव्हते. त्यांचे ते उद्‌गार म्हणजे राज्यशकटाने भारावलेल्या मनाचे दोन आळोखेपिळोखे होते. त्यांना खरोखरच अधिक महत्त्व देण्याचे कारण नव्हते. पण वर्तमानपत्रकार हे सनसनाटीचे वातावरण निर्माण करण्याचे वस्ताद असतात, आणि त्यांच्या या उद्योगाला जयप्रकाश काहीसे बळी पडले यात शंकाच नाही. पण ते लगेच सावरले. या वृत्तपत्रीय व्यपदेशाने थोडेसे वैतागलेच. आपल्या जीवनदानाची ही एक प्रकारे चेष्टाच होत आहे हा विचार त्यांना डसला, आणि त्यांनी "थॉट" पत्राला एक पत्र लिहून "आपण काय करीत आहोत याचा अर्थ कळत नाही असे टीकाकारांनी कृपा करून समजू नये' असे तीव्र उद्‌गार काढले. आत्मसंदेहाची सावली पसरण्यापूर्वीच त्यांनी ती दूर केली.

× × ×

आत्मसंदेहाला अवसर मिळेल अशी जे. पीं. ची प्रकृती जात्याच नसूनसुद्धा आत्मसंदेहाचे अरिष्ट कोसळण्यासारखी परिस्थिती त्यांच्या आयुष्यात उद्भवलीच.

पहिला प्रसंग ते अमेरिकेहून परत आल्याबरोबर लगेच निर्माण झाला. गांधीजींची भेट झाल्याबरोबर त्यांनी जयप्रकाशांना सांगितले की, 'प्रभाने आजन्म ब्रह्मचर्याची शपथ घेतली आहे--तू दुसरे लग्न कर' हा वज्राघातच होता. आणि त्याचे स्वरूप गुंतागुंतीचे होते. प्रभावतीजींनी त्यांना लिहिलेल्या एका पत्रात आपला बेत त्यांना कळविला होता. आपण परत आल्यानंतर याचा निर्णय करू असे यावर जयप्रकाशांनी त्यांना लिहिले होते. या पार्श्वभूमीवर गांधीजींनी प्रभावतीजींना ब्रह्मचर्याची शपथ घेण्याची परवानगी दिली हा बेजबाबदारपणा होता--आणि तो या महात्म्याच्या ठिकाणी पाहण्याची जे. पीं. ची तयारी नव्हती. दुसरे असे की, जयप्रकाशांच्या मार्क्सवादी मनाला ब्रह्मचर्य, वगैरे गोष्टी थोतांड वाटत होत्या. खरे म्हणजे असा काही निर्णय, नवऱ्याशी त्याचा पूर्ण खल केल्याखेरीज, प्रभावतीजींनी घ्यावयास नको होता. पण त्या लहान होत्या. त्यांची समज अद्याप प्रगल्भ नव्हती. आश्रमीय वातावरणाने त्या वेढलेल्या होत्या. खरे म्हणजे गांधीजींनीच त्यांना 'थोडा धीर धर' असे सांगायला हवे होते पण त्यांच्या 'सत्याच्या प्रयोगा'चा विचित्र उद्रेक झाला. याउप्पर त्यांनी जे. पीं. ना दुसऱ्या लग्नाचा सल्ला देणे ही तर निर्घृण उपेक्षावृत्ती होती. जयप्रकाशांच्या मनावर झालेला आघात त्यांच्या मनात घिरटीप्रमाणे घरघरला.



या परिस्थितीत, 'आता माझे कर्तव्य काय', एवढेच नव्हे 'मी कोण आहे? विवाहित की विवाहमुक्त ?' असा प्रश्न उठणे अपरिहार्य होते. या प्रश्नाचे उत्तर दुसऱ्या लग्नाचा कौल देणारेच ठरायला हवे होते असे नाही. 'विवाहबाह्य संबंध' हेही उत्तर मिळू शकत होते. काही म्हटले तरी जयप्रकाश तेव्हा कम्युनिस्ट होते. हिंदू वैवाहिक नीतीने बांधले जाण्याची कोणतीही अंतिम-नैतिक जबाबदारी त्यांच्यावर नव्हती. विलक्षण गोष्ट अशी की जयप्रकाशांशी संबंध जुळविण्यास उत्सुक असलेल्या चतुर सुंदर स्त्रिया अवतीभोवती होत्या. पण पुढे जयप्रकाशांनी हर्बर्ट पासीनना सांगितल्याप्रमाणे 'यात फसवेगिरी असते', आणि हा मार्ग जयप्रकाशांच्या प्रकृतीलाच मानवण्यासारखा नव्हता.

जयप्रकाश प्रकृतीनेच उदात्त. त्यांनी व्रतबद्ध--व्रतबंदिस्त राहायचे तर ठरविलेच, पण प्रभावतीजींशी असलेल्या त्यांच्या संबंधांचा असा काही विकास झाला की त्या त्यांची सखी, सहचरी, माता, कन्या वगैरे सारे काही बनल्या. त्या त्यांचे दुसरे जीवितच बनल्या.

आणि १९७३ साली त्या कॅन्सरने गेल्या तेव्हा जयप्रकाशांना आपला एक प्राणच गळून पडला असे वाटले. हा धक्का इतका जबरदस्त होता की जयप्रकाशांचा जीवनवृक्षच मुळापासून हादरला. खरे म्हणजे 'आत्मसंदेह' हा शब्दच निःसंदर्भ ठरावा अशी परिस्थिती निर्माण झाली. ते एक विलक्षण स्वरूपाचे आत्मिक विसर्जन होते. एक प्रकारचे आत्मिक निर्वाण. आश्चर्य वाटेल की या वेळी जयप्रकाशजी सारे काही सोडून वृत्तपत्रीय लेखनाला वाहून घेण्याचा विचार करीत होते. 'आता मी दुसरे काय करणार?' असे हताश उद्‌गार त्यांनी आमच्यापाशी काढले होते.

अशीच काहीशी स्थिती, १९७५ च्या कारावासात त्यांची झाली होती. 'माझ्या भोवती उभे जग कोल-

अनुक्रमणिका

मडून पडले आहे.' असे उद्‌गार त्यांनी आपल्या 'जेल–डायरी'त काढलेले आहेत. एक तर भारताच्या पुनरुत्थानाचे त्यांचे स्वप्न भंग पावले होते, आणि त्यांच्या प्रकृतीने कधी नव्हे असा दगा दिला होता. आणीबाणीने लोकांची धारणा जी निपचित पडली होती तो आघात अधिक विदारक होता,

पण हे लक्षात ठेवले पाहिजे की, या दोनही प्रसंगी त्यांना आत्मसंदेहाची बाधा झाली होती असे नाही. प्रभावतीजी गेल्यानंतर लवकरच जयप्रकाशांनी बिहारचे भव्य आंदोलन उभारले आणि अवघा देश एका नव्या तेजस्वितेनें माखून काढला. तुरुंगात जडलेल्या किंवा जडविलेल्या व्याधीमुळे ते वरेचसे अपंग झाले तरी त्यांनी केवळ आपल्या नैतिक प्रभावाने जनतापक्षाची उभारणी केली. शेवटी जनता पक्षाने जे दिवे लावले त्याने जे. पीं. चा आत्मसंदेह होण्याची शक्यताच नव्हती. त्यांच्या जीवनाचे दीपच मालवत आले होते.

× × ×

एखाद्याला आत्मसंदेहाची बाधा झाली आहे किंवा नाही हे ओळखण्याचे एक गमक आहे–त्याचे कार्य. आत्मसंदेहाने पोखरून निघालेल्या व्यक्तीच्या हातून कर्तृत्वाचे मनोरे उभारले जात नाहीत.

काही ऐतिहासिक उदाहरणांनी या प्रश्नाकडे पाहता येईल. लेनिनचेच उदाहरण घ्या. लेनिनला आत्मसंदेहाची बाधा होणे शक्यच नव्हते. आपण म्हणजे कम्युनिस्ट क्रांतीचे एक अमोघ हत्यार अशीच त्याची धारणा होती. आपण एका अपरिहार्यपणे उलगडत जाणाऱ्या इतिहासाचे साधन आहोत अशी त्याची मनोमन निश्चिती होती. त्यामुळेच स्वतःच्या स्खलनशून्यतेबद्दल त्याला निर्विवाद खात्री होती. आपण नेहमी बरोबर, आपले विरोधक चूक याबद्दल त्याला कणमात्र शंका नसे. त्याच्या युक्तिवादाचे स्वरूपच हे सिद्ध करते. ज्या ज्या विषयाबर तो मतप्रदर्शन करी त्या त्या विषयातले आपल्यालाच काय ते कळते, आपले विरोधक नुसते चूकच नव्हत तर क्रांतिद्रोही प्रतिगामी भांडवलवाल्यांचे आणि धार्मिक दलालांचे बगलबच्चे आहेत याबद्दलही तो निःशंक असे. त्याचे मतांतर झाले तर, काल ज्या मतांचा प्रचार आपण करीत होतो ते मत आज मांडणारे लोक बदमाष क्रांतिद्रोही आहेत असे धडाकून म्हणण्याची त्याची तयारी असे. आपण इतिहासाचे हत्यार' आहोत याबद्दल त्याला शंका नसल्यामुळे त्याचा आत्मा नेहमी शांत, स्वलुब्ध असे. आणि म्हणूनच त्याने इतिहास निर्मिला.

स्टालीनसुद्धा आत्मसंदेहापासून मुक्त होता. याचे कारण मात्र लेनिनच्या उलट होते. तो क्रांतीचे हत्यार नव्हता. क्रांती हे त्याने स्वतःच्या वर्चस्वाचे हत्यार बनविले. लेनिनने कधी काहीही स्वतःसाठी, स्वतःचे कीर्तिस्तंभ उभारण्यासाठी, केले नाही. उलट स्टालीन हे सत्ताविकृतीचे एक विलक्षण रोगट उदाहरण होते. सत्तेसाठी विध्वंसाचे वणवे पेटविण्यात त्याला आत्मपूर्तीचे समाधान वाटे. पण या वणव्यावर आत्मसंदेहाचा धूर कधी उठला नाही.

आपल्याकडील उदाहरणे आपल्याला अधिक भावतील. महात्मा गांधींना आत्मसंदेहाची बाधा कधी झाली नाही, कारण ते 'आतल्या आवाजा'ने चालत. लो. टिळकांना कधी अशी बाधा झाली नाही, कारण ते मनानेच कर्मयोगी होते.

याच्या उलट आगरकर. ते एकाचवेळी सुधारक होते आणि तेजस्वी स्वराज्यवादी होते. ईश्वरी योजनेचे थोतांड त्यांना मान्य नव्हते. त्यावेळच्या परिस्थितीत या दोन निष्ठांत तात्त्विक नाही तरी व्यावहारिक विसंवाद अपरिहार्य होता, आणि या विसंवादाचे ते बळी होते. म्हणून सुधारणेच्या त्यांच्या कार्याला महर्षी कर्वे अगर गोपाळराव गोखले यांच्याप्रमाणे सक्रियरूप कधी प्राप्त झाले नाही. वान्याश्रम अगर कार्याश्रम यांच्या रूपाने ते कधी आकारास आलेच नाही. आगरकर आज उरले आहेत ते एक त्यागी पुरुष आणि तेजस्वी लेखक म्हणून.

आत्मसंदेहाचे निःशंक उदाहरण म्हणजे पंडित जवाहरलाल नेहरू. आपण भारतीय की अभारतीय, आपण आधुनिक की गांधीजींच्या रूपाने परंपरेशी बांधलेले, समाजवादी की उदारमतवादी, सारे जीवन नियोजनाने बांधून काढण्याची स्वप्ने पाहणारे की व्यक्तीच्या विकासासाठी जीवनाची अनेक क्षेत्रे मुक्त राखू पाहणारे, राजकारणी की विचारवंत, तत्त्वाचा आग्रह धरणारे की पक्षाची बांधिलकी मानणारे, इत्यादी गोष्टींचा पक्का निर्णय त्यांना कधी,

करता आला नाही. परिणामी अनेक मोक्याच्या प्रसंगी ते किंकर्तव्य झालेले आढळत, आणि याची भरपाई ते एखाद्या फालतू गोष्टीत भलता आग्रह धरून करण्याचा प्रयत्न करीत, अनेक महत्त्वाच्या प्रसंगी ते मूढावस्थेने जखडलेले दिसत. नाहीतर हंगेरीतील क्रांतीच्या वेळी, चीनच्या तिब्बटवरील आक्रमणाच्या प्रकरणी, केराँ–कृष्णामाचारी–कृष्ण मेनन प्रभृतींच्या भ्रष्टाचाराबाबत ते कर्तव्यशून्य आणि कर्तृत्वशून्य बनले नसते. एवढया मोठया राष्ट्रावर आणि जनहृदयावर त्यांचा अप्रतिहत अंमल प्रस्थापित झाला, पण नवे राष्ट्र निर्माण करण्यात त्यांना मोठे यश आले असे झाले नाही. त्यांचे सारे यश अकरणात्मक होते–म्हणजे त्यांनी देशाला स्थिर राज्य दिले, लोकशाहीचे वातावरण अबाधित राखले–पण त्यांनी परिवर्तनाची अगर प्रबोधनाची जिवंत शक्तिशाली धारा निर्माण केली असे घडले नाही. याच्या उलट वल्लभभाईंचे पाहा त्यांनी निरंकुश सत्तेची स्वप्ने पाहाणाऱ्या संस्थानिकांना कसे हा हा म्हणता वठणीवर आणले, हे एकच उदाहरण त्यांच्या कर्तृत्वाची ग्वाही देण्यास पुरेसे आहे. गांधींची खुनाची शिला गृहमंत्री म्हणून त्यांच्या डोक्यावर उभी राहिली–पण भलतीच नैतिक जबाबदारी नसत्या प्रमाणात शिरावर घेऊन शिलावस्थेप्रत जाण्यास त्यांनी सक्त नकार दिला. गांधींच्या मृत्यूची जबाबदारी त्यांच्या डोक्यावर ठेवणाऱ्या जयप्रकाशांच्या विधानाने सुद्धा ते विचलित झाले नाहीत. आत्मसंदेहाचा भ्रम होणारे व्यक्तित्व त्यांचे नव्हतेच.

× × ×

अशा कार्यराशींची अपेक्षा जयप्रकाशांकडून करणे अन्यायाचे ठरेल. प्रथम त्यांनी सत्तेचा स्वीकार केलाच नाही. सत्तेच्या प्राङ्गणाबाहेर राहून जे कार्य होते ते लोकांच्या समोर फारसे येतच नाही. दुसरे असे की एखाद्या पक्षाचे, प्रवृत्तीचे अगर आंदोलनाचे सर्वसमर्थ सूत्रधार असे कधी ते नव्हतेच. इंदिरा गांधींच्या दुष्ट आणि भ्रष्ट कारभाराविरुद्ध जे ७४–७५ चे आंदोलन त्यांनी केले ते त्यांचे इतिहासाला कलाटणी देण्याचे अपवादात्मक कार्य. त्यातून आणीबाणी आली, जनता पक्षाचा उदय झाला, आणि पुढे त्याचे तुकडेही झाले. पण या साऱ्यातून गांधीवादी विचाराचे आणि प्रतिकाराचे जे दर्शन झाले ते महत्त्वाचे होते. गांधीवादाचे ते एक अर्थपूर्ण पुनरुज्जीवन होते. गांधींनंतर गांधीवादाची सूत्रे विनोबांकडे गेली. त्यांनी गांधीवादाला जे अप्रतिकारात्मक रूप दिले त्याने त्या उज्ज्वल तत्त्वज्ञानाची सारी तेजस्विताच नष्ट होत होती. विनोबा हे गांधीवादाचे अंतिम भाष्यकार म्हणून कायम राहिले असते तर या ओजस्वी तत्त्वज्ञानाला एखाद्या व्रतेवैकल्यांनी वेढलेल्या धर्माचाराचे रूप प्राप्त झाले असते. जयप्रकाशांनी गांधीवादाची या आपत्तीतून सुटका केली ही त्यांची फार मोठी कामगिरी झाली. त्यांनी भावी कालासाठी गांधीवाद शाबूत राखला ही खरोखर ऐतिहासिक घटना घडली. या पुनरुज्जीवित गांधीवादाचे नवनवे दर्शन ते घडवू शकले नाहीत, कारण ते आजारी झाले, आणि विनोबांच्या वातावरणात निमलेले गांधीवादी त्यांचे कार्य करण्यास आवश्यक त्या जिद्दीने आणि कल्पनाशीलतेने पुढे आले नाहीत. नाहीतर दक्षता–समितींच्या रूपाने जे. पीं. नी जे मार्गदर्शन केले त्याच्या प्रकाशात गांधीवादी विधायक क्रियाशील दक्षतेची पुढली पावले टाकली गेली असती, आणि त्याचा उपयोग जनता पक्षाचा आत्मा शाबूत राहण्यासही कदाचित झाला असता. तरीपण जे. पीं नी जो मार्ग दाखविला त्याचे मोल फार आहे.

आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे जयप्रकाशांनी आपल्या सोज्वळ सार्वजनिक आणि वैयक्तिक वर्तनाने देशाच्या सार्वजनिक जीवनात एक नैतिक शक्ती उभी केली. त्यांच्या रूपाने नैतिक शक्तीच वावरली. राजकारणाचा सत्तावादी विलास सर्वत्र संचरत असताना आणि सर्वांचे चित्त त्याने बांधून घेतलेले असताना या नैसर्गिक शक्तीची तेजस्विता नेहमीच प्रभावी ठरणे जवळपास अशक्यच झाले. पण १९५६ साली हंगेरीतील क्रांतीच्या संदर्भात नेहरूंनी, आक्रमक हुकूमशहांना पोषक असे बोटचेपे धोरण अवलंबिले तेव्हा या नैतिक शक्तीने उग्र अवतार धारण करून देशाची सदसद्विवेकबुद्धी जागृत केली, आणि नेहरूंनी, आडून–अडखळून का होईना, हंगेरियन क्रांतीच्या रूपाने स्वातंत्र्यवादाचे दर्शन घडले अशा अर्थाची कबुली दिली-तेव्हा नैतिक शक्तीचे तेज काय असते याचा प्रत्यय आला. इंदिरा

अनुक्रमणिका

गांधींच्या विरुद्ध हेच तेज जयप्रकाशजींनी उभे केले. ही फार मोठी कामगिरी झाली–कारण देशाला ज्याप्रमाणे उदात्त तत्त्वज्ञान लागते त्याप्रमाणे ओजस्वी नैतिकताही लागते आणि ती कोणाच्या तरी रूपाने आविष्कृत व्हावी लागते. तसे न झाले तर काय होतें याचे प्रात्यक्षिक रशियात घडले. लेनिनने मार्क्सवादाचे मोठे प्रभावी शस्त्र बनविले, पण त्याला नैतिक अधिष्ठान तो देऊ शकला नाही. उलट मार्क्सवादी दृष्टीत जी एक नैतिकता अनुस्यूत होती ती त्याने झटकून टाकली. परिणाम असा झाला की लेनिनवादी राजनीतीतून अपरिहार्यपणे स्टालिन निर्माण झाला. आणि आज मार्क्सवाद ही निर्घृण हुकूमशाहीची आणि पाजी राजनीतीची एक प्रणाली बनली आहे. उलट जयप्रकाशांनी गांधीवादाचे केलेले उज्ज्वल पुनरुज्जीवन आणि त्याला स्वतःच्या चारित्र्याच्या रूपाने दिलेले नैतिक अधिष्ठान हा राष्ट्राचा मोठा ठेवा बनला आहे.

आत्मसंदेहाची बाधा जयप्रकाशांना होऊ शकली नाही याचे कारण मला त्यांच्या नैतिकतेतच दिसते. जयप्रकाशांचे जीवन ही नैतिकतेचीच एक रेखा होती. सोज्वळपणा, सरलपणा आणि अंतःकरणाचा निर्मळपणा हे त्यांचे स्वाभाविक गुण होते. मलिनपणाचा त्यांच्या अंतरंगाला कधी स्पर्श झाला नाही. वक्रतेचा त्याला कधी छेद गेला नाही. स्वार्थाची सावली त्याच्यावर कधी पडलीच नाही. अहम्‌चा विकार त्यांना कधी जडलाच नाही. त्यांच्या अहम्‌ने उफाळून उठाव असा कधी केलाच नाही. याचा अर्थ त्यांना स्वत्व नव्हते, स्वतःचे व्यक्तित्व नव्हते, अगर या व्यक्तित्वाला त्याच्या आवडीनिवडी नव्हत्या असे नाही. पण त्यात त्यांचा अहम् गुंतलेला नसल्यामुळे या व्यक्तित्वाला विकृतीची बाधा कधी झाली नाही. अहंकाराचे सावट या व्यक्तित्वावर कधी पडले नाही. त्याचे स्वरूप नेहमीच स्वच्छ निर्मळ राहिले. अशा व्यक्तित्वाला आत्मसंदेह कसा बाधणार ?



अनुक्रमणिका








बापूराव नाईक

# महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार : व्यक्ती आणि कार्य



म. म. दत्तो वामन पोतदार यांचे शुक्रवार दि. ६ ऑक्टोबर १९७९ रोजी पहाटे पुण्यात निधन झाले. त्यांच्या पुतण्याच्या घरी, म्हणजे त्यांच्या स्वतःच्याच घरी. ही दुष्ट बातमी मला सकाळी ८ च्या सुमारास श्री. लाटकर यांच्या कल्पना प्रेसमधून दूरध्वनीवरून देण्यात आली. त्यावेळी 'दिनांक' साप्ताहिकाचे श्री. जयंत धर्माधिकारी माझ्या घरी होते. ते म्हणाले दिनांक साठी लेख लिहा. अंक छापत होता म्हणून मी लगेच लिहायला बसलो. माझी कल्पना अशी की दत्तोपंत वाईला निवर्तले. मी त्यांना ऑगस्ट महिन्यात भेटून त्यांच्या बरोबर ४ दिवस राहून आलो होतो. त्यावेळी प्रकृतीची विशेष तक्रार नव्हती पण फार थकलेले होते. परंतु इतक्या लवकर जातील असे वाटले नव्हते. वाईला लगेच निघावे असे वाटले. वाईला टेलिफोन केला तर्कतीर्थांच्या घरी. पण ते साहित्य-संस्कृती मंडळाच्या सभेसाठी मुंबईस आले होते. शिपायाने टेलिफोनवर पोतदारांच्या निधनाची हकिगत खरी आहे असे सांगितले; परंतु ते पुण्यात होते हे सांगितले नाही. थोड्या वेळाने महाराष्ट्र सहकारी मुद्रणालयाचे श्री. रणदिवे यांचा टेलिफोन आला. ते म्हणाले, मॅजिस्ट्रेट आठल्ये याना बरोबर घेऊन या. कुठे ते विचारायचे सुचले नाही. श्री. आठल्ये यांचा टेलिफोन लागेना. नंतर बऱ्याच वेळाने कळले की दत्तोपंत पुण्यातच निवर्तले आणि त्यांची अंत्ययात्रा तिथे दुपारी निघेल. पण तेव्हा निघून पुण्यास पोहोचणे शक्य नव्हते. ती. दादांचे अन्त्यदर्शन काही आम्ही घेऊ शकलो नाही.

### दत्तोपंतांच्या निधनाने झालेले महाराष्ट्राचे नुकसान :

आपले ज्येष्ठ सहकारी इतिहासाचार्य राजवाडे यांचे ६३ व्या वर्षी निधन झाले, तेव्हा दत्तोपंतांनी लिहिले होते,

> "हे वृत्त वाचून प्रथम आश्चर्य आणि पाठोपाठ शोक यांचा धक्का बसून विव्हल झाला नाही असा सुशिक्षित आणि देशाभिमानी महाराष्ट्रीय विरळाच सांपडेल. त्यांची ती मूर्ति यापुढे प्रत्यक्ष सृष्टींत पुनरपि दृष्टीस पडावयाची नाही यात संदेह नाही. मात्र कार्यरूपाने महाराष्ट्रीयांच्या चित्तांत ठसलेली मूर्ति अजरामर राहील हेही तितकेच निःसंदेह आहे."

हे दत्तोपंतांचे लिखाण त्यांसच लागू पडणारे आहे. पण त्याहूनही जास्त समर्पक उद्‌गार त्यांनी कै. विष्णुशास्त्रींवरील "शास्त्रीबोवांचा कर्मयोग" या लेखांत काढले आहेत. ते दत्तोपंतांना बऱ्याच अंशी लागू पडतात. दत्तोपंतांचा हा लेख १९१२ साली केसरीत प्रसिद्ध झालेला आहे.

> "... पुण्यपत्तनस्थ पौरजनांची मुखे आज अगदी म्लान झाली होती; नेत्र निस्तेज झाले










असून सर्वत्र दुःखाची काळिमा पसरली होती. त्यांचे धैर्य नष्ट झाले असून शरीर कंपित होत होते; जसा एखादा विजेचा धक्का बसावा त्या प्रमाणे त्यांचे काळीज चर्र होत असून मरणाचे मूळ केव्हां येईल याचा बिलकूल नेम नाही हे साधु-संतांकडून वारंवार कानी कपाळी ओरडले जाणारे त्रिकालाबाधित सत्य प्रत्यक्ष अनुभवाला आल्या-मुळे जबरदस्त वैराग्याचे साम्राज्य त्यांच्या हृद-यांत माजून राहिले होते! ऐका, त्यांचे दुःखो-द्गार नीट लक्षपूर्वक ऐका! मराठी भाषेचा पुरस्कर्ता गेला! सत्यज्ञानमय अपूर्व पुष्पांची माला गुंफणारा आटोपला! लोकांच्या डोळ्यांत दिव्य अंजन घालून त्यांची दृष्टी स्वच्छ करणारा नेत्र-वैद्य निमाला! अज्ञान समुद्रांत गटंगळ्या खाणा-रांना हात देऊन वांचविणारा नाहीसा झाला. मिथ्या कल्पनांनी मोहांध झालेल्यांना ताळ्यावर आणणारा समर्थ मांत्रिक या नश्वर जगास सोडून चालता झाला...

पण शास्त्रीबोवा खरोखरच मेले काय? त्यांनी उभारलेल्या संस्था व पेरलेली बीजें वाया जाण्यासारखी होतीं काय? छे! छे! शास्त्रीबोवा चिरकाल टिकणाऱ्या सत्याचे प्रतिपादक होते. त्यांचा सत्पक्ष होता; त्यांची तत्त्वे निर्मळ व सनातन होती. ती लयाला कशी जातील? खुद्द शास्त्रीबोवाहि याच कारणास्तव 'नास्ति येषां यशःकार्ये जरामरणजं भयम्!' या अपूर्व कोटीं-तील विभूति! त्यांचा बाह्यदेह मुळचाच नाशि-वंत, तो गेला म्हणून ते गेले की काय? त्यांचा यशःकाय अजरामर आहे."

दत्तोपंत म्हणजे दिलखुलास व्यक्तिमत्त्व. सदा आनंदी, तल्लख बुद्धिमत्ता. हजर-जबाबी, अति प्रेमळ, अजातशत्रू, आतिथ्यशील आणि मदतीस सदा तत्पर. त्यांच्याकडे अनेक सामाजिक थरांतले शैक्षणिक, वैज्ञानिक, संशोधन-साहित्य प्रान्तातील असे विविध प्रकृतीचे, विविध विचारांचे लोक येत असत. त्यांच्या अडोअडचणी दत्तोपंत निवारण करतील असा त्यांचा विश्वास असे. दत्तोपंतही त्यांना निराश करत नसत. आपला अमूल्य वेळ त्यांच्या-साठी दवडीत. सभा संमेलने, व्याख्याने यांची त्यांना सारखी आमंत्रणे असत. ती ते स्वीकारीत. पदरमोड करून प्रवास करत. हे मी प्रत्यक्ष पाहिले आहे.

## दत्तोपंतांचा प्रफुल्ल सहवास

ती. दादांचा आणि माझा संबंध आज चाळीस वर्षांचा आहे. १९३७ मध्ये मॅट्रिक झाल्यावर मी पुढील शिक्षणासाठी मुंबईस येताना मुद्दाम पुण्यास उतरलो तो कै. न. चिं. केळकर आणि प्रा. दत्तोपंत पोतदार यांचे दर्शन घेण्यासाठी. त्यानंतर १९४१ साली मी पुण्यास येरवडा प्रेसमध्ये नोकरीस लाग-ल्यावर १९४९ साली मुंबईस बदलून येईपर्यंत त्यांच्याच घरी असे.

महामहोपाध्याय मुंबईस आले म्हणजे त्यांचा मुक्काम प्रा. न. र. फाटक यांच्याकडे गिरगावातील भटवाडीत असे. नंतर माझे वांद्रयास घर झाल्या-वर माझ्याकडे किंवा धोबितलावाला मॅजिस्ट्रेट श्री. आठल्ये यांच्याकडे त्यांचा मुक्काम असे. मी हा लेख "नवभारत" साठी लिहितो आहे. त्यांत महामहोपाध्यायांच्या विद्वत्तेच्या क्षेत्रांतील कामगिरी-विषयी लिहायचे अशी साहजिक अपेक्षा. ते बरो-बरही आहे. पण दत्तोपंतांचे सम्यक दर्शन घडवायचे तर त्यांच्या खाजगी—म्हणजे तसे जाहीरच—आयुष्या-विषयी लिहिणे आवश्यकच आहे. त्यांच्याबद्दल लिहिताना त्यांच्या सदा प्रफुल्लित, वात्सल्यपूर्ण आणि सहृदय रसिक प्रकृतीचा विचार बाजूला करणे अशक्य.

## महाराष्ट्र संस्कृती आज पोरकी झाली

महामहोपाध्याय दत्तोपंत पोतदार गेले, महा-राष्ट्राचा तेजस्वी ब्राह्मण अनंतत्वात विलीन झाला. महाराष्ट्राची जाज्वल्य अस्मिता आज झांकळली, महाराष्ट्रेतिहास संशोधन पोरके झाले. महाराष्ट्र भाषेचा प्रभावशाली वाग् अलंकार निष्प्राण झाला. हे सर्व खरे असले तरी माझ्यासारख्या अनेकांचा घरातील वडीलधारा माणूस गेला. मॅजिस्ट्रेट आठ-ल्यांचा पितृतुल्य आधार गेला. प्रा. फाटकांचा जन्मभरचा परममित्र गेला. हे अनेकांच्या बाबतीत खरे आहे. त्यांच्या निधनानंतर दिनांकसाठी लिहि-ताना महाराष्ट्राचे विद्वता आणि संस्कृती क्षेत्रांतील नुकसान किती झाले यापेक्षा आमचे कौटुंबिक नुक-सान अपरिमित झाले हाच विचार मनात प्रबळ होता.

अनुक्रमणिका

## दत्तोपंतांची तत्परता

वेंगुर्ल्यासारख्या दक्षिण रत्नागिरीतील एका लहान गांवीं माध्यमिक शाळेत असताना महाराष्ट्र साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षांची भाषणे वाचायची इच्छा झाली. बेळगांव साहित्य संमेलनाचे अध्यक्ष शिवराम महादेव परांजपे आणि मडगांव साहित्य संमेलनाचे अध्यक्ष वामन मल्हार जोशी यांची भाषणे आमच्या ग्रंथसंग्रहालयांत उपलब्ध नव्हती. मी प्रा. दत्तोपंतांना पत्र लिहून विनंती केली की, या भाषणाच्या प्रती मला पाठवाव्यात. ही गोष्ट १९३५ सालची. उलट डाकेने मला उत्तर आले की, प्रा. वामन मल्हार जोशींच्या भाषणाची प्रत पाठवली आहे. परांजप्यांच्या भाषणाची प्रत हाताशी नाही. वेंगुर्ल्याजवळील मालवण येथे डॉ. आजगांवकर यांच्यापाशी ती मिळू शकेल. आठ दिवसांनी दुसरे पत्र, परांजपे यांच्या भाषणाची प्रत पाठवली आहे ! मी एक शालेय विद्यार्थी, माझ्या विनंतीची इतक्या आस्थेने दखल घ्यायचे तसे अगत्य नसावे; पण हे दत्तोपंतांचे वैशिष्टय. अशा सहस्रो माणसांना त्यांनी मदत केली. त्यांत आपला अमूल्य वेळ दवडला. हे त्यांच्याकडून फारसे लिखाण झाले नाही याचे एक कारण आहे. मी एक कारण म्हणतो कारण याहून महत्त्वाचे असे एक दुसरे कारण आहे. त्याबद्दल मी पुढे लिहिणार आहे.

वेंगुर्ले सोडून मी मुंबईस स्थाईक झालो. १९४१ मध्ये नोकरीनिमित्त पुण्यास गेलो. दत्तोपंत तेव्हा "लोककल्याण" मध्ये रहात असत. त्यांची पुस्तके लावायचे काम चालू होते. त्यात मी त्यांना मदत करीत असे. आपल्या पत्रव्यवहाराच्या स्थळप्रतींच्या वह्या लावताना दत्तोपंतांनी १९३६ सालची वही काढून त्यांत मला लिहिलेल्या वरील पत्राची स्थळप्रत दाखवली ! त्यांचा सर्व पत्रव्यवहार त्यांच्या उत्तरांसह असा उपलब्ध आहे. या त्यांच्या उद्योगांत त्यांचा बराच वेळ जायचा.

## दत्तोपंतांचे कुटुंब, परिवार आणि पूर्वायुष्य

दत्तोपंतांचा जन्म ५ ऑगस्ट १८९० रोजी बिरवाडी, तालुका महाड जिल्हा कुलाबा येथे झाला. त्यांचे वडील वामन मोरेश्वर पोतदार यांच्याच हाताखाली त्यांचे प्राथमिक शिक्षण सुरू झाले. नंतर वयाच्या सहाव्या वर्षी पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूल मध्ये ते १८९६ साली दाखल झाले. त्यावेळी त्यांच्याबरोबर नंतर सुप्रसिद्ध झालेले वकील दंडवते, डॉ. राहातेकर, मेहेंदळे अशी मंडळी होती. १९०६ साली दत्तोपंत मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण झाले. १९०७ पासून १९१० पर्यंत तें फर्ग्युसन कॉलेजमध्ये होते. त्यांना एक भाऊ, दामुअण्णा पोतदार आणि एक बहीण. ती पुरंदऱ्यांकडे दिली होती. हे दांपत्य बरीच वर्षे आफ्रिकेत वास करून होते. दत्तोपंतांचे धाकटे बंधू दामुअण्णा हे आचार्य अत्र्यांचे समकालीन. ते कर्तबगार होते. स्वतःचा इलेक्ट्रिक सामानाचा व्यवहार त्यांनी उत्तम प्रकारे सांभाळला. किर्लोस्कर कारखाने आणि महाराष्ट्र बँक यांत ते संचालक होते. दत्तोपंत तेव्हा शनवारात फुटक्या बुरुजाजवळील गल्लीत स्वतःच्या घरात रहात असत. तळमजल्यावर दामुअण्णांचे इलेक्ट्रिक सामानाचे दुकान. पहिल्या मजल्यावर ( पुण्याच्या भाषेत दुसरा मजला ) राहाती जागा आणि वर दत्तोपंतांचे वास्तव्य असे.

दत्तोपंतांच्या लेखनास कॉलेजमध्ये असतानाच सुरुवात झाली. सीनियर बी. ए. च्या वर्गात असताना कॉलेज त्रैमासिकाच्या दुसऱ्याच अंकात त्यांचा "पुराण वस्तु संशोधन" हा लेख प्रसिद्ध झाला आहे. नूतन मराठीचे प्रिन्सिपॉल आपटे यांनी दत्तोपंतांना ६ जून १९१२ म्हणजे वयाच्या बाविसाव्याच वर्षी नू. म. वि. मध्ये शिक्षक म्हणून दाखल करून घेतले. पगार मासिक रु. २५. १९१५ मध्ये ते शिक्षण प्रसारक मंडळीचे आजन्म सदस्य झाले आणि नंतर नू. म. वि. चे मुख्याध्यापक झाले. १९२१ साली वयाच्या ३१ व्या वर्षी न्यू पूना कॉलेजमध्ये मराठीचे प्राध्यापक झाले आणि नंतर मराठीबरोबरच इतिहास विषय शिकवू लागले. ते सर परशुराम भाऊ कॉलेजमध्ये १९३६ पर्यंत प्राध्यापक होते. त्या वर्षी महाराष्ट्र युनिव्हर्सिटी स्थापन व्हावी म्हणून प्रयत्न करण्यासाठी ते निवृत्त झाले आणि युनिव्हर्सिटीच्या प्रचारकार्यास त्यांनी वाहून घेतले. त्यांच्या एका मित्राने त्यांना मोटर दिली होती. तीतून आणि इतर साधनांनीही दत्तोपंत महाराष्ट्रभर सर्वत्र फिरले. महाराष्ट्र युनिव्हर्सिटीच्या प्रचारासाठी.

## दत्तोपंतांचे संस्थाजीवन

भारतेतिहास संशोधन मंडळ १९१० साली कै. वि. का. राजवाडे, आणि मेहेंदळे यांनी स्थापन केले. त्याचे पोतदार सदस्य झाले. प्रथम दोन तीन वर्षे त्यानी दुय्यम कार्यवाहाचे काम केले. त्यानंतर कार्यवाह पदावर ते ४० वर्षे होते. मग कार्याध्यक्ष झाले. दत्तोपंतांचा अनेक संस्थांशी संबंध आला. संस्थापक म्हणून, कार्यवाह म्हणून आणि इतर अनेक प्रकारे. संस्थांतील दत्तोपंतांची कामगिरी महत्त्वाची असा अभिप्राय त्यांचे परममित्र प्रा. न. र. फाटक यांनी दत्तोपंतांना श्रद्धांजली वाहताना व्यक्त केला आहे. दत्तोपंतांचा संबंध आलेल्या काही संस्था म्हणजे–

१) शिक्षा विचार मंडळ २) आरोग्य मंडळ ३) पुणे मराठी ग्रंथालय ४) डेक्कन जिमखाना देशी खेळ ५) भांडारकर ओरिएन्टल इंस्टिट्यूट ६) महाराष्ट्र साहित्य परिषद–मराठी साहित्य संमेलन ७) भारतेतिहास संशोधन मंडळ, पुणे. ८) वक्तृत्वोत्तेजक सभा, पुणे. ९) वैदिक संशोधन मंडळ, १०) टिळक महाविद्यापीठ ११) मराठी साहित्य महामंडळ, इत्यादी.

या संस्थांचे अनेक जटिल प्रश्न दत्तोपंतांनी सोडविले आहेत. त्यात वेळ दवडला आहे. दत्तोपंतांचे संस्थांतील कार्य अतिमहत्त्वाचे मानावे लागते कारण त्यांनी संस्थांतील वादांचा निकाल लावला, एवढेच नव्हे तर दोन्ही पक्षांना समाधान वाटेल अशाप्रकारे लावला असे दोन्ही पक्षांना वाटायचे. यात दत्तोपंतांच्या व्यक्तित्वाचा दबदबा होताच; पण त्यांचा निर्णय निर्विकार, निःपक्षपाती आहे अशी दोन्ही पक्षांची खात्री पटायची.

## दत्तोपंत : एक कल्पक व्यवस्थापक–

दत्तोपंत हे एक कल्पक व्यवस्थापक होते. त्याचे एक उदाहरण : त्यांच्या कारकीर्दीत नू. म. वि. चे प्रमुख कारकून ठार बहिरे होते. त्यांना बोलवायचे तर घंटेचा उपयोग नव्हता. या कामात एक शिपाई कायम अडकून पडायचा. दत्तोपंतांनी शक्कल काढली. त्या प्रमुख कारकुनाच्या मेजावर रंगीत दिवे बसवले. बटने आपल्या मेजावर. वेगवेगळ्या रंगांना वेगवेगळा अर्थ. हजेरीपट घेऊन या– पिवळा रंग. शाळेचे हिशेब-पुस्तक आणा– तांबडा रंग वगैरे.

दत्तोपंतांच्या फुटक्या बुरुजापाशीच्या घरातील प्रवेशाबाबतही एक व्यवस्था होती. कोणी आले की त्यांनी तळमजल्यावरून घंटेचे बटन दाबायचे. वरून घंटेचे बटन दाबले जाई आणि मगच वर जायचे. दत्तोपंत कामात असले तर स्वतःच जिन्याच्या वर येत, तिसऱ्या सप्तकात "कोण आहे" असे विचारीत आणि त्यांनी परवानगी दिली की वर प्रवेश मिळे.

## दत्तोपंत म्हणजे धांदल धावपळ

१९४३ साली सांगलीला मराठी रंगभूमीचा शतसांवत्सरिक महोत्सव होता. त्यासाठी मुंबईहून १५० प्रतिनिधी सकाळच्या गाडीने निघाले होते. मी तेव्हा येरवडा प्रेसमध्ये नोकरी करीत होतो. माझ्याकडे कामगिरी होती की मी दत्तोपंतांना घेऊन ठीक १२ वाजता स्टेशनवर यावे. त्याच बरोबर एक पोते भुईमुगाच्या शेंगा आणि एक डबा (घासलेटचा साफ केलेला) दही घेऊन यायचे. शेंगा आणि दही घेऊन बैलगाडीतून पुढे पाठवले. पण दत्तोपंतांना घेऊन स्टेशनवर यायचे हे काम फार कठीण. आम्ही बरोबर १२॥ वाजता स्टेशनवर पोहचलो. गाडीत शिरलो तेव्हा ती हललीच होती.

एकदा दुपारी १२ वाजण्याच्या सुमारास मी दत्तोपंतांकडे गेलो. खालची घंटा वाजवली. दत्तोपंत वर आले. म्हणाले, कोण आहे? मला पाहताच म्हणाले, वर या. वर गेलो. त्यांचे स्वयंपाकी कानेटकर मला म्हणाले, दादांना जेवायला उठायला सांगा. आंत गेलो. न्हावी उभा होता. तो म्हणाला, दादांना दाढी करायची आहे. दत्तोपंत कांही तरी लिहीत होते. तें होतें अध्यक्षीय भाषण. हैद्राबादच्या ओरिएन्टल कॉन्फरन्सचे ते अध्यक्ष निवडले गेले होते. इतक्यात श्री. घाटे यांचा शिपाई आला. त्याने श्री. घाटे यांचे पत्र आणले होते. त्या वर्षी I. C. S. चे मराठीचे पेपर्स तपासण्यासाठी श्री. घाटे आणि प्रा. दत्तोपंत पोतदार यांजकडे आले होते. श्री. घाटयांनी पेपर्स दत्तोपंतांकडे पाठवले होते; परंतु ते दत्तोपंतांना सांपडत नव्हते. मला म्हणाले, की बाजूच्या खोदणात ते ठेवले आहेत, पाहून आणा. मी








खोदणात पाहिले. एक मांजरी बसली होती पिल्लाना उबवीत. त्या खाली I. C. S. चे पेपर्स होते. बाहेर काढून साफ केले आणि श्री. घाटचांच्या शिपायाच्या हवाली केले.

## दत्तोपंतांचा लेखनसंसार

दत्तोपंतांनी काही लिहिले नाही असा त्यांच्यावर आरोप आहे. त्यांचे एकमेव स्वतंत्र पुस्तक म्हणजे "**मराठी गद्याचा इंग्रजी अवतार**". "हा सर्व ग्रंथ दत्तोपंतांनी साऱ्या २०–२२ दिवसात रात्रंदिवस खपून लिहून व छापूनहि काढिला." असे श्री. काशिनाथ नारायण साने यानी प्रथमावृत्तीच्या प्रस्तावनेत लिहिले आहे. या ग्रंथात दत्तोपंतांनी १८१० ते १८७४ पर्यंतच्या मराठी ग्रंथांची नोंद घेतली आहे. मराठीतील पहिले ग्रंथ मुंबईत प्रसिद्ध झाले. त्यांची मूळ प्रेरणा माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टनची. या पुस्तकात काही मौलिक अभिप्राय व्यक्त केले आहेत. पुस्तकाचे समग्र परीक्षण करणे इथे शक्य नाही. त्यातील एकच अभिप्राय इथे देतो.

> "१८१०–२० पासून तो १८७०–७५ पावेतो जे मराठी वाङ्मय निर्माण झाले त्याची दूर नजरेने व खोल बुद्धीने परीक्षा केल्यास त्यांत राष्ट्राला चेतवण्याचे सामर्थ्य का उत्पन्न झाले नाही याचे मुख्य कारण हा या अवताराचा इंग्रजीपणाच होय, हे निभ्रांत ठरते. पण १८७४ त विष्णुशास्त्र्यांनी जेव्हा आपले शिंग फुंकले तेव्हा मात्र महाराष्ट्राने ओळखीचा आवाज पाहून तिकडे कान टवकारून का पाहिले याचे गूढ हा ऐतिहासिक चष्मा लाविला म्हणजे राहात नाही"…. "या पाऊणशे वर्षांत (१८०० – १८७४) एकहि अलौकिक किंवा अजरामर ग्रंथ मराठीत झाला नाही. लहान सहान सटरफटर ग्रंथ भाराभर झाले. 'तारागण' पुष्कळ उगवला; पण तमोनाशक चंद्र मात्र कोठेच आढळला नाही"

मराठीच्या साहित्य संसारातील हे दारिद्र्य का याचे उत्तर दत्तोपंत देतात–

> "जेथे विद्यापीठे कर्तव्यभ्रष्ट, विद्वानमंडळी भ्रांत व आळशी, तेथे निराळे काय होईल ? होईल तर आश्चर्य ! मायेवाचून रड नाही आणि जाळावाचून कड नाही; हेच अखेर खरे"



या त्यांनी वर्णिलेल्या परिस्थितीत आजही फरक पडलेला नाही.

## दत्तोपंतांचे लिखाण अल्प का ?

दत्तोपंतांनी फारसे लिहिले नाही हे खरे पण त्याचे कारण काय याचा कोणी विचार केला आहे काय ? आपण अपेक्षेप्रमाणे लिखाण करीत नाही याची दत्तोपंतांना योग्य कल्पना होती. "भाषाशुद्धिविवेक" अर्थात "माधवरावांची– भाषाशुद्धि" या **लोकशिक्षणाच्या** "पटवर्धन" विशेषांकात ते स्वतःच लिहितात–

> "प्रस्तुत लेखकास भाषाशुद्धिप्रकरणी माधवरावांचे कित्येक सिद्धांत अमान्य होते आणि आहेतहि. त्याने आपला मतभेद लेखरूपाने प्रकट केला नाही याचे एक कारण त्याचा दीर्घसूत्री स्वभाव !"

दत्तोपंतांचे एक शिष्य कै. दा. पां. रानडे "दत्तो वामन पोतदार विविधदर्शन" या पुस्तकाला जोडलेल्या निवेदनात म्हणतात–

> "कुणी म्हणतील 'पोतदारांचे लिखाण दाखवा' अशा सवालांना उत्तर म्हणून हे पुस्तक निघाले.' त्यांचे लेख गोळा करून त्यांच्या पन्नासाव्या वाढदिवसाला हे पुस्तक छापून काढण्याची आवश्यकता भासली ना ? मग त्यानी ग्रंथलेखन केले नाही असे म्हणणारांस दोष का द्यायचा ? 'लेख लिहावयाचे व ते छापून आणीत बसावयाचे ही पोतदारांची प्रवृत्तीच नाही. असल्या प्रकारचे साहित्यसेवक पोतदार नाहीत. पण जे ते लिहितील ते मात्र सर्व दृष्टीने अगदी पारखलेले असे नाणेच निघेल हे मात्र अगदी खरे."

एखादा लेख लिहायचा तर त्या विषयाचा सर्व बाजूने अभ्यास केल्यावाचून, संदर्भ तपासल्यावाचून ते लेखणी हातात धरत नसत. त्यांचे वाचन विपुल आणि चौफेर असे. वाचायची पुस्तके ते बहुधा विकत घेत किंवा त्यांना भेटीदाखल आलेली असत. त्यांवर ते लाल पेन्सीलीने खुणा करीत, समासात लिहित. त्यांच्या संग्रहातील पुस्तके अशी चिताडलेली दिसतील. त्यातील संबंधित पुस्तके पाहिल्याशिवाय ते लिहीत नसत.

अनुक्रमणिका

### दत्तोपंतांचा ग्रंथसंग्रह आणि त्याची व्यवस्था : "लोककल्याण"

शिवचरित्राची त्यांची जी कल्पना होती त्याप्रमाणे ते त्यांच्याकडून कधीच लिहिले जाणार नाही हे पूर्वीच कळण्यासारखे होते. शिवचरित्र-लेखनाचे काम स्वीकारले तेव्हा ते "लोककल्याण" या त्यांच्या वाड्यात वसती करून होते. दत्तोपंतांचे घर शनवारवाड्याच्या फुटक्या बुरुजासमोरील गल्लीत होते. ते वडील बाबासाहेब पोतदार यांच्या हयातीत दत्तोपंतांनी विकत घेतले होते. तिथे तिसऱ्या मजल्यावर त्यांचा ग्रंथसंग्रह होता. तो नित्य वाढत होता. त्याच्या वजनाने घर कोलमडेल असे वाटल्यामुळे त्यांचे बंधु दामुअण्णा यांनाही त्या संग्रहाची अन्य व्यवस्था करणे आवश्यक वाटू लागले होते. दत्तोपंतांचे एक स्नेही धोंडुमामा साठे यांच्या मदतीने शनवार पेठेतील आपटे घाटानजीकचा चिपळूणकर यांचा वाडा विकत घेतला. त्याला लोककल्याण नाव देऊन तिथे ते १९४२ पासून राहू लागले. तिथे ते १९६१ पर्यंत राहात होते. शिवचरित्र लिहायचे काम अंगावर घेण्यापूर्वीपासून हा प्रचंड ग्रंथ-संभार ते व्यवस्थित लावीत होते. वाड्याच्या तिसऱ्या मजल्यावर वृत्तपत्रांच्या फायली आणि न लावलेल्या पुस्तकांचे गठ्ठे होते. तळमजला भाड्याने छापखान्यास दिला होता. पुढे धोंडुमामांना पैशाची गरज लागली. तेव्हा हा वाडा विकावयास दत्तोपंतांनी संमती दिली. तोवर त्यावर त्यांनी हजारो रुपये खर्च केला होता. दत्तोपंतांना ही जागा सोडावी लागू नये म्हणून कै. दा. वि. गोखले आदी त्यांच्या स्नेह्यांनी सुमारे १५००० रुपये जमवून तो त्यांच्यासाठी विकत घ्यायचे ठरवले होते. परंतु हा व्यवहार न जमल्यामुळे पैसे ज्यांचे त्यास परत केले.

### ग्रंथसंभाराचे दातेवाड्यात स्थलांतर

त्यावेळी मेहुणपुऱ्यातील श्रीधर विठ्ठल दाते यांच्या दातेवाड्याचे ट्रस्टी दत्तोपंतांचे सहाध्यायी आणि मित्र श्री. अण्णासाहेब रायरीकर त्यांच्या मदतीस आले. तिथे तिसऱ्या मजल्यावर हा संभार हालवण्यात आला. वाड्याच्या सुधारणेत पुन्हा दत्तोपंतांनी हजारो रुपये खर्च केला. विहिरीवर स्वखर्चाने पंप बसवून वाड्यात सर्वत्र नळ घेतले. आपला सर्व संग्रह दत्तोपंतांनी परत नव्याने लावला आणि शिवचरित्र साधने लावायला सुरुवात केली. परंतु ही व्यवस्था काही कायमची नव्हती. दाते वाडा ट्रस्टीच्या आधीन होता. इतक्यात दत्तोपंतांची पुण विद्यापीठाच्या कुलगुरुपदी नियुक्ती झाली आणि सहा वर्षे त्यांच्या अभ्यासांत खंड पडला. एकदा विद्यापीठाच्या कामातून मुक्त झालो म्हणजे चरित्र-लेखनास जोराने सुरुवात करणार असे ते म्हणत असत. कुलगुरुपदाची मुदत संपल्यावर आपल्या ग्रंथसंग्रहास कायमचे घर शोधण्यास त्यांनी सुरुवात केली.

### दत्तोपंतांचे 'आनंदीधाम'

दत्तोपंत शिक्षण प्रसारक मंडळीत आजीव सेवक म्हणून १९१५ साली रुजू झाले तेव्हा त्यांचे मासिक वेतन फक्त रु. ७० होते. १९३४ मध्ये ते निवृत्त झाले तेव्हा ते १४० रुपये पर्यंत वाढले होते! निवृत्तिवेतन रु. ७०. पुढे ते रु. २०० करण्यात आले. शिवाय राष्ट्रपतींकडून मिळणारे रु. १५०० चे वर्षासन आणि महामहोपाध्याय बहुमानाची वार्षिक रु. १०० दक्षिणा इतकेच त्यांचे उत्पन्न. त्यातील मोठा भाग लोककल्याणच्या आणि दाते वाड्याच्या डागडुजीत खर्च झालेला. पुस्तकांची खरेदी चालूच असे. ते इटलीस गेले तेव्हा त्यांना आजूबाजूस फिरतां यावे म्हणून त्यांचे बंधू दामुअण्णा यांनी रु. १५०० आणि मुंबई मराठी साहित्य संघाने रु. १३०० साहाय्य केले. अशी त्यांची सांपत्तिक स्थिती होती. त्यांतून सुमारे १०–१२ हजार त्यांनी शिल्लक टाकले. ही रक्कम पुण्यात जागा घेण्यास केवळ अपुरी होती म्हणून त्यांचे लक्ष वाईकडे वळले. दुसरे कारण वाईच्या मातीत वाळवी नाही ही गोष्ट ग्रंथसंग्रहालयास उपयुक्त होती.

घर शोधण्याच्या मोहिमेत मी एकदा त्यांच्या बरोबर होतो. आज जी आनंदीधाम वास्तू आहे तिथे सुमारे २००० चौरस फूट जागा असलेले फार जुने घर आम्ही पाहिले. मागे जागा आणि उत्तम बारमाही पाण्याची विहीर. तिथे मला शक्तीची एक मूर्ति सांपडली. तिची मग दत्तोपंतांनी घरात स्थापना केली. ही जागा घर-विहिरीसुद्धा रु. १०००० स त्यांनी विकत घेतली. त्यांच्या मित्रमंडळीने, शिष्यांनी आणि हितचिंतकांनी डॉ. वा. रा. ढमढेरे यांच्या

पुढाकाराने ३८००० रुपयांचा निधी जमवून घराची डागडुजी केली. मागे दोन खोल्या बांधल्या. त्यांना राहाण्यासाठी एक मोठी खोली जोडून स्नानगृह असलेली. आणि स्वयंपाकघर बांधले. शिवाय रस्त्यालगत एक दालन बांधण्यात आले. त्यांचे ग्रंथ पुण्याहून वाहून नेण्यास स्टेट ट्रान्स्पोर्टचे सहाय्य झाले. कपाटांसाठी मुख्यमंत्री श्री. वसंतराव नाईक यांनी रु.५००० मंजूर केले. अशा रीतीने "आनंदी धाम" सिद्ध झाले. ते सर्व ग्रंथसंग्रहासह आणि चीज वस्तूसह त्यानी विश्वस्त पत्र करून शिक्षण प्रसारक मंडळीस दान केले.

"आनंदी धाम" विषयीच्या स्वदस्तुरच्या टिपणीत दत्तोपंत म्हणतात–

"... संचित झालेले धन यांतील एक मोठा भाग मला शिक्षण प्रसारक मंडळीनेच दिलेला आहे. आणि 'गंगातर्पण गंगे' या न्यायाने आनंदी धामाच्या रूपाने आणि माझ्या ग्रंथादि सर्व संभाराच्या रूपाने मी ते मंडळीकडे सुपूर्द करीत आहे."

"ज्या जेझुइट लोकांच्या संस्थांचा आदर्श पुढे ठेवून टिळक प्रभृतींनी जीवन समर्पिले, त्या जेझुइट लोकांनी आपल्या सेवकांसाठी महाबळेश्वर, खंडाळा, कोडाई कॅनाल अशा सुंदर हवेच्या ठिकाणी आपल्या दीक्षितांना तन्दुरुस्तीसारख्या प्रसंगासाठी जाऊन राहण्याच्या सुंदर सोई केलेल्या आहेत. आमच्या संस्थांनी मात्र या दिशेने काहीही केलेले नाही. त्या दिशेने स्वशक्यानुसार क्षुद्र दिसला तरी शुभारंभ म्हणून मी आनंदीधामचा हा संकल्प सिद्धीला नेला आहे. विद्योपासना किंवा तन्दुरुस्ती, अल्पविश्राम, लेखन कार्य, चिंतन आदि करण्याला एखादे अधिष्ठान असावे, म्हणून आनंदीधाम मध्ये बांधलेली वास्तू लहानच असली तरी ती वाढविण्यासाठी पुष्कळ मोकळी जागा संपादून ठेवली आहे. ...'उत्पत्स्यन्तेऽस्ति मम कोऽपि समान धर्मा । कालोह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी ॥'!

## शिवचरित्राचे न झालेले लेखन

आनंदीधाममध्ये राहायला आल्यावर दत्तोपंतांनी शिवचरित्र लेखनाचा जाहीर "श्रीगणेशा" केला पण त्यांचा ग्रंथसंग्रह लागायचाच होता. शिवचरित्रलेखनास आवश्यक अशी बरीच उपलब्ध सामग्री त्यावेळेपर्यंत प्रसिद्ध झाली होती. शेजवलकरांचे शिवचरित्रलेखन नंतर सुरू झाले होते. दत्तोपंतांनी लेखनास सुरुवात करण्यापूर्वीच शेजवलकर निवर्तले. पण त्यांची विस्तृत प्रस्तावना आणि साधनांची यादी, कालपट मराठी मंदिराने आकर्षक सजावटीत सुबकपणे मुद्रित केला. पिसुर्लेकरानी पोर्तुगीजमध्ये प्रथम प्रसिद्ध केलेली मराठ्यांच्या इतिहासाची साधने इंग्रजीमध्ये प्रकाशित होत होती. औरंगजेबाच्या कारकीर्दीतील अखबार बिकानेर संग्रहातून संपादन करून श्री. खरे मराठीत प्रसिद्ध करीत होते. सेतुमाधवराव पगडी शिवचरित्रावर लेखन करीत होते. व्याख्याने देत होते. म्हणजे चरित्रलेखनास आवश्यक अशी बरीच साधनसामग्री जमा झाली होती. परंतु केवळ त्यावर आधारित असे शिवचरित्र पोतदार लिहिणार नव्हते. शिवकालीन भारतातील भौगोलिक, ऐतिहासिक भाषिक, सांस्कृतिक, साहित्तिक संघर्ष ते तपासणार होते. अखिल जगतात त्या काळांतील ऐतिहासिक, सांस्कृतिक परिस्थितीचा ते अभ्यास करणार होते. आणि अशा विस्तृत पार्श्वभूमीवर लिहिणार होते. छत्रपतींच्या कार्याचे मूल्यमापन करणार होते

अर्थात त्यांची शिवचरित्रलेखनाची ही कल्पना कितीही प्रशंसनीय असली तरी व्यवहार्य होती का. प्रत्यक्षात आणणे शक्य होते का ? अशी शंका आम्हा पामराना पडते आमच्या मर्यादा लक्षात घेता अपरिहार्य होते. दत्तोपंताची कल्पना भव्य होती. आत्मविश्वास दांडगा होता. उद्योग करायची हिंमत होती. त्यांचे शिवचरित्र एक आदर्श वीरपुरुष चरित्र झाले असते. ते अवलोकून कार्लाईललाही आपले सिद्धांत पुन्हा तपासून पाहावे असे वाटले असते. परंतु हे सर्व घडणार नव्हते.

## दत्तोपंत, जातिवंत शिक्षक

दत्तोपंत हाडाचे शिक्षक होते. आयुष्यांतील उमेदीची वीस वर्षे त्यानी शिक्षक पेशात काढली. नंतर शिक्षण प्रसारक मंडळीच्या संचालक मंडळाचे अध्यक्ष झाले आणि पुणे विद्यापीठाचे कुलगुरू झाले. त्यांच्या शिक्षणविषयक कामगिरीबद्दल लिहायला या लेखाची मर्यादा अपुरी आहे. त्यांच्या "शिक्षणाचा

कोंडमारा" या १९१८ साली प्रसिद्ध झालेल्या लेखांतील एक उतारा इथे देतो.

देशात प्राथमिक शिक्षण सक्तीचे मोफत केल्याशिवाय, मातृभाषेतून शिक्षण दिल्याशिवाय, गावांगणिक विद्यामंदिरे स्थापल्याशिवाय, धंदेशिक्षण, लष्करी शिक्षण, नाविक शिक्षण, स्त्रीशिक्षण इत्यादी उपेक्षित शाखांचे शिक्षण जारीने सुरू केल्याशिवाय, अधिकाऱ्यांच्या दडपेगिरीने गुदमरणाऱ्या शिक्षणसंस्थांतून स्वातंत्र्याची शुद्ध व मोकळी हवा मुबलक खेळविल्याशिवाय पदभ्रष्ट झालेल्या राष्ट्राच्या पूर्व परंपरेला स्वस्थानी पुनरारूढ केल्याशिवाय, शिक्षणाची सर्व सूत्रे लोकांच्या हाती दिल्याशिवाय, हिन्दुस्थानचा रोग बरा होणार नाही, पण हे होण्याला एक मायेचे सरकार तरी पाहिजे. किंवा अचाट कर्मयोगी तरी पाहिजे ! एरव्ही हे घडणार नाही व हिन्दुस्थानची प्रेतकळा जाणार नाही.

## दत्तोपंतांचे भाषण कौशल्य

संयुक्तमहाराष्ट्राच्या स्थापनेचा आग्रह दत्तोपंतांनी पूर्वीपासूनच धरला होता : 'भाषावार विद्यापीठे' या लेखात ते १९३७ मध्ये लिहितात:–

"लोकशाहीत लोकांची मते तयार करायची असतात. मते तयार करताना सत्ता मिळवावी लागते. नुसती मने तयार करून भागत नाही. मने व मते दोन्ही तयार करावयाची तर त्याला भाषेवाचून कसे चालणार ? असे भाषेचे महत्त्व व योग्यता आहे"

जाति राहोत वा जावोत, धर्म राहो वा जावो, इतर भेद राहोत वा जावोत, पण एकभाषेचा भाऊपणा इतका बळकट व चिवट केला पाहिजे की मराठी बोलणाऱ्या मराठ्यांचा एक अभेद्य गट तयार होईल.

म्हणून मराठी बोलणाऱ्यांचा प्रान्त होईल तर ते उत्तम. भावी राजकारणात तिकडे लक्ष दिले पाहिजे. मराठी गुजराथी, बंगाली कानडी अशा प्रमुख प्रांतिक भाषांप्रमाणे आमचे गट तयार झाले पाहिजेत. म्हणजे आमचा प्रत्येक गट बाळसेदार व बाणेदार बनविता येईल."

–प्रांत रचनेमध्ये साहित्यिकांनी लक्ष का घालणे इष्ट आहे त्याचे दत्तोपन्तांनी सयुक्तिक समर्थन केले आहे. बडोदे वाङ्मयपरिषदेच्या अध्यक्षस्थानावरून १९५३ मध्ये समाजजीवनावरील राजकारणाची छाया हेरून त्यामुळे बंधने वाढत जाणार याचे भविष्य त्यांनी वर्तवले होते.

"राज्य घडणीचा आणि साहित्याचा वास्तविक संबंध काय ? साहित्य हा प्रतिभेचा आविष्कार आहे. तो प्रज्ञेचा प्रकाश आहे. आणि प्रतिभा आणि प्रज्ञा यांना कोण कसली अटक घालणार ?" असे कोणी विचारतील. एकेकाळी या म्हणण्यात काही तथ्य होते; पण आता सर्व जीवनच नव्या बंधनांनी व्याप्त होत चालले आहे. वास्तविक अन्नाचा आणि राज्याचा असा काय अविनाभाव आहे ? पण आजचा अनुभव काय दर्शवितो ? राजकीय घडणीवर आज जीवन इतके अवलंबित झाले आहे आणि या बंधनाची कक्षा इतकी वाढत आहे आणि पकड एवढी पक्की होत आहे की, या क्षेत्रांतील स्वातंत्र्य शब्दांतच राहण्याचे भय समोर उभे ठाकल्याशिवाय राहणार नाही."

भाषावार प्रान्तरचना होऊनही हे भय आज सत्य ठरले आहे. त्यापूर्वीच दत्तोपंतानी हे हेरले होते. त्यांत त्यांचा द्रष्टेपणा दिसून येतो.

गोव्याच्या मुक्तिदिनाचे कोवळे किरण त्यांना १९५८ सालीच विलेपार्ले येथे भरलेल्या गोमंतक साहित्य संमेलनातच दिसत होते.

"फिरंगी पापात्मा" म्हणून आमच्या पूर्वजांनी वर्णन केला. अद्यापि तो सुधारला नाही. केव्हातरी तो निघून जाईल आणि तुम्ही आम्ही मुक्त गोमंतकात थाटाने प्रवेश करू. तो फिरंगी पूर्वी जसा 'वैभवी कमानी' तून प्रवेश करीत असे तसे आपण आपल्या हुतात्म्यांना साक्षी ठेऊन साऱ्याच दिशांनी आपल्या पुण्यभूमीच्या कुशीत शिरू. तो दिवस दूर असला तरी निश्चित उगवणार. त्या भावी मुक्तिदिनाचे किरण माझ्या दृष्टीला येथून आजच तुमच्या मुखमंडळावर प्रतिबिंबित झालेले दिसत आहेत. या, तर मग या संमेलनात गोमंतकाचे स्मरण करीत आपण एकमेकांस भेटू आणि गोमंतकाच्या स्मरणाचा जागर जागवूं"

अनुक्रमणिका

दत्तोपन्तांची सर्वच भाषणे वक्तृत्वाचा आदर्श ठरणारी आहेत. भाषण कसे **लिहावे** ते दत्तोपन्तांपासूनच शिकले पाहिजे. १९४३ मध्ये निजाम प्रान्तीय संमेलनात अध्यक्षस्थानावरून दत्तोपंत म्हणतात:-

ज्ञानेश्वरी सारखा कोहिनूर, किंवा दासबोधासारखे आणि तुकोबागाथ्यासारखे कौस्तुभ आणि स्यमंतकमणि आमच्या संग्रही पूर्वीपासून आहेत. हे आमच्या जवळ राहतील तोवर आमची कीर्ति अमर राहील; परंतु प्रत्यहीचे जीवन काही कोहिनुरांवर आणि कौस्तुभांवर होत नाही. तो आमचा जुना ठेवणीतला साठा आहे. ते काही चलन नव्हे. तेच आमचे चालक आहेत. त्यांच्या जोरावर नवे चलन आम्ही काढले पाहिजे. काढलेही असते! परंतु आमच्या ह्या अनर्घ्य रत्नांचे आमच्याच कर्माच्या अभिशापामुळे आम्ही कोळसे करून टाकले! या महार्ह रत्नांचे कोळसे झाले आणि आम्ही कोठे माणसे राहिलो आहोत ? आमची 'मढी' बनली आहेत. समर्थांच्या काळीहि त्याना तेच दिसले आणि दुःखाने उद्गारले :

'मढ्यासी भेटलें मढें ! करील काय बापुडें !'

पण थांबा निराश होऊ नका ! प्रयत्नांचा भाता चालवा आणि पहा; याच कोळशांतून स्फुलिंग निर्माण होतील आणि त्या दिव्य अग्नीने या कोळशांची नवीन रत्ने बनतील. नवे अवतार होतील. नवे जीवन नांदू लागेल ! असा नवकायाप्रवेशाचा महायोग आम्हास शिकला पाहिजे. तरच आमचा तरणोपाय आहे.

### ब्रह्मचारी दत्तोपंताचा संसार

दत्तोपंत हे आजन्म ब्रह्मचारी होते. त्यांनी तशी शपथ घेतली नव्हती. किंबहुना कोणी पृच्छा केली तर ते म्हणत, अजूनही मी विवाह करू शकतो. यातील विनोदाचा भाग सोडला तरी मला असे म्हणावेसे वाटते की ते अत्यंत संसारी वृत्तीचे होते. त्यांचा स्वतःचा संसार नव्हता पण इतरांच्या संसाराची त्यांनी आजन्म काळजी केली. त्यांचे धाकटे बंधु दामुअण्णा यांच्या संसाराची काळजी, त्यांच्या मुलांचे संगोपन यांकडे त्यांनी जातीने लक्ष पुरवले, हे मला माहित आहे. ज्यांच्या ज्यांच्याशी त्यांचा संबंध आला त्यांच्या त्यांच्या संसारांत दत्तोपंताना एक वडीलधारी व्यक्ति म्हणून असाधारण मान होता.

दत्तोपंत पुणे विद्यापीठाचे कुलगुरु असताना एकदा आम्ही त्यांच्याकडे विद्यापीठांतील त्यांच्या निवासस्थानी गेलो होतो. बरोबर माझा धाकटा मुलगा होता. असेल तेव्हा सहासात वर्षांचा; त्याने बरोबर त्याचे पाठ्यपुस्तक आणि वही घेतली होती. आम्ही निघालो तेव्हा ती तिथेच राहिली. येरवड्यास आम्ही पोहोचल्यावर थोड्याच वेळात कुलगुरूंची मोटर दारासमोर उभी. दत्तोपंत माझ्या मुलाचे पुस्तक आणि वही घेऊन आले होते ! नंतर लगेच एका जरूरीच्या सभेला निघून गेले !

### दत्तोपंताचा मुंबई मराठी साहित्य संघावरील लोभ

डॉ. भालेराव आणि दत्तोपंत यांचा चांगला स्नेह होता. त्याकाळी ते मुंबईत प्रा. न. र. फाटक यांच्याकडेच उतरत. साहित्य संघाने गिरगावात जागा घेतली हे सर्वाआधी डॉ. भालेरावांनी प्रा. फाटक आणि दत्तोपंत पोतदार यांना कळवले. साहित्य संघाच्या सर्व महत्त्वाच्या कार्यक्रमांस दत्तोपंत उपस्थित असत. १९४४ साली संघातर्फे शतसांवत्सरिक नाट्योत्सव झाला तेव्हा दत्तोपंतांना घेऊन मी पुण्याहून मुंबईस निघालो. भायखळ्यास रेल्वेगाडी थांबली. कारण गोदीत स्फोट झाला होता. आम्ही तिथून गिरगावात हमालाच्या डोक्यावर सामान देऊन चालत गेलो. सबंध उत्सवात दत्तोपंत आमच्या बरोबरीने राबले !

१९४४ साली पुण्यास मराठी रंगभूमीशताब्दी उत्सव साजरा झाला तो 'नाट्यनवरात्र' या नावाने. ही कल्पना दत्तोपंतांची. स्वागताध्यक्ष डॉ. भडकमकर. अध्यक्ष न. चिं. केळकर आणि दत्तोपंत कार्याध्यक्ष. मी कार्यवाह होतो. उत्सव यशस्वी झाला. मी हिशोब पुरे करून अहवाल तयार केला आणि दत्तोपंतांकडे सुपूर्द केला. तो त्यांना पाहायला काही वेळ होईना. शेवटी मी माझा अहवाल साप्ताहिक नवयुगमध्ये प्रसिद्ध केला. परंतु दत्तोपंतांना त्यावर शिक्कामोर्तबकादि करायला सवड झाली नाही. आजतागायत या उत्सवांतून शिल्लक उरलेले पैसे

मात्र त्यांनी अविलंबे मुंबई मराठी साहित्य संघाच्या हवाली केले.

आपल्या दीर्घसूत्रीपणाचा त्यांनी माधवराव पटवर्धनांच्या संघर्भात उल्लेख केला आहे. त्याचे एक उदाहरण. १९३५–३६ च्या दरम्यान कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे हस्तलिखित, त्यांचे सर्व्हिस बुक आणि इतर कागद त्यांना विष्णुशास्त्र्यांच्या एका कुटुंबियाने दिले. साहित्य परिषदेत संरक्षित करण्यासाठी. हे कागद अतिमोलाचे आहेत. त्यांवरून एक लेख लिहायचा त्यांचा विचार होता; पण त्यांना ते १९७० पर्यंत जमले नाही. मला त्यांनी हे कागद दाखवले. मी त्यांना त्यांच्या फोटोप्रती करून दिल्या आणि मूळ कागद साहित्य परिषदेकडे मूळ दात्याच्या इच्छेप्रमाणे घ्यावे असे विनवले. तसे झाले. पण त्यांचा लेख काही त्यांच्या हयातीत पुरा झाला नाही. झाला असता तर अत्युत्तम झाला असता याविषयी मला शंका नाही.

## दत्तोपन्ताचे संसारी जीवन

दत्तोपंत हे संसारी होते असे मी म्हणतो त्याचे कारण १९३७ पासून त्यांच्याशी माझा साक्षात् संबंध आहे आणि मी त्यांचा संसारी बाणा अनुभवला आहे. १९४१ पासून १९४८ पर्यंत तर मी त्यांच्या बरोबर लोककल्याणमध्येच राहत होतो. माझे वांद्रयास घर झाल्यावर दत्तोपंत माझ्याकडेच उतरायचे.

आम्ही गृहप्रवेश करणार ती तारीख आणि वेळ मी काही त्यांना कळवली नव्हती. पण त्यांना ती परस्पर कळली आणि ते मुंबईस उपस्थित झाले. पत्ता काढून घरी आले. एक दिवस राहिले. रात्री कोणाला नकळत गच्चीवर गेले आणि खाली पडून पायाला दुखापत झाली. दुसऱ्या दिवशी सकाळी त्यांचा पाय रक्तबंबाळ पाहून आम्ही त्यांना विचारले तेव्हा कळले. पण त्यांनी आपण म्हणून काही सांगितले नव्हते.

दत्तोपंत हे महाराष्ट्रवादी होते. मराठी माणसांनी आपले सर्व लेखन मराठी भाषेतून करावे असा त्यांचा आग्रह असे. महाराष्ट्र भाषेविषयी त्यांना आत्यंतिक प्रेम होते. "महाराष्ट्रांतील सौंदर्य स्थळे" हा लेख चित्रमयजगत् मध्ये १९३७ साली लिहिला. त्यांतील एक उतारा. दत्तोपंतांची लेखनशैली दाखवणारा पुढे देतो.

"कोकण आणि देश अशा जणूं कांही दोन झडपाच सह्याद्रीच्या दांडचाने आमच्याकडे आपोआपच साधल्या आहेत. कोठेही सह्याद्रीचा कडा चढून गेले की आपण एका ताशीव भिंतीच्या टोकावर चटकन् जाऊन उभे रहातो आणि तेथून समुद्रापावेतो नजर चालवू शकतो. सह्याद्रीच्या भिंतीखालच्या कोकणपट्टींत आम्हांला मनमुराद समुद्रशोभा पहावयास मिळते. नारळीचीं आणि पोफळीचीं बनेंच्या बनें थाटामाटाने आपल्या चवऱ्या तेथे आमच्या मस्तकावर ढाळीत असतात. समोर समुद्राची रणगर्जना चालू असते आणि आम्ही राजाप्रमाणे ऐटीत आपली स्वारी काढीत असतो, असे निसर्ग सुख आमच्या भाग्याने आमच्या वाटचास या कोकणपट्टीत आले आहे. हा आमचा पाताळ, आणि हाच आमचा नागलोक. खारी हवा आणि खारे पाणी याची तम्मा आम्ही या सुखानंदापुढे बिलकूल धरीत नाही. गवती पेंढारू घरांत राहून परसांतल्या आंब्याफणसांच्या राशीत आम्ही ऐटीने आणि आनंदाने काळक्रमणा करितो"

"सह्याद्रीच्या भिंतीला मोठाली विवरें आहेत. काही आम्ही माणसांनी पाडली आहेत. त्यांतून वर चढून जाऊन आम्ही देशभागांत प्रवेश करतो. निरा, कृष्णा, गोदा आणि भीमा अशा आमच्या गोड पाण्याच्या नद्या आम्हास जीवन पुरवीत असतात– आणि ज्वारी बाजरीचे मोतीदाणे आमच्या पदरांत टाकीत असतात. आमची तट्टें आम्हांला आमच्या मुलुखगिरीत साहाय्य करण्याकरिता सिद्ध असतात, आणि आमची खानदेशी खिल्लारें दूधतूप पुरवून आमची मजबुती करीत असतात."

"सह्याद्रीच्या कडचाकोंपऱ्यांवर शत्रूंना अजिंक्य अशी आमची दुर्गम दुर्गस्थळें आमच्या भयाचें निवारण करीत असतात. आणि त्यांच्या आश्रयाने आम्ही निर्धास्त असतो. वाटेल तेव्हां सरसरसर् सरडयाप्रमाणे आम्ही सह्याद्रीचे कडे चढून जातो आणि मनास येईल तेव्हां सह्याद्रीच्या

(पुढील मजकूर पान ६१ वर पहा.)











अनुक्रमणिका

रजनी कोठारी : अनु. मे. पुं. रेगे

# आकांक्षापूर्तीचे राजकारण :

[ प्रसिद्ध राज्यशास्त्रज्ञ डॉ. रजनी कोठारी यांच्या 'डिलिव्हरिंग धि गुड्स' ह्या निबंधाचे भाषांतर पुढे दिले आहे. मूळ इंग्रजी लेख 'सेमिनार' च्या ऑक्टोबर १९७९ च्या अंकात प्रसिद्ध झाला आहे. –का. संपादक ]

---

राष्ट्राध्यक्षांनी ऑगस्ट १९७९ मध्ये जो हस्तक्षेप केला त्याचे जून १९७५ मध्ये आणीबाणी पुकारण्याच्या कृतीशी एका बाबतीत साम्य आहे. अर्थात् हे साम्य एकाच बाबतीपुरते मर्यादित आहे. ह्या दोन्ही कृतींमूळे एऱ्हवी ज्या राजकीय प्रक्रिया घडून आल्या असत्या त्या उधळून देण्यात आल्या. एका प्रकरणात पंतप्रधानांनी राष्ट्राध्यक्षांना कृती करायला भाग पाडले होते. दुसऱ्या प्रकरणात, स्वतःच्या ताकदीवर अधिकारपदावर रहायला असमर्थ ठरलेल्या पंतप्रधानांच्या केविलवाण्या परिस्थितीचा राष्ट्राध्यक्षांनी वापर केला. हा भेद असला तरी त्याला तितकेसे महत्त्व नाही. महत्त्वाची गोष्ट अशी, की ह्या दोन्ही कृतींचा परिणाम सर्वसामान्य राजकीय प्रक्रियांमध्ये विच्छेद निर्माण होण्यात झाला.

शिवाय, ह्या प्रकरणांशी संबंधित असलेल्या दोघा पंतप्रधानांनी जर आपापली अधिकारपदे सोडून दिली असती तर त्याचा लाभ प्रामुख्याने श्री. जगजीवनराम यांना झाला असता अशी वस्तुस्थिती आहे. पण तीही एका दृष्टीने गौण आहे. मुद्याची गोष्ट अशी आहे, की जो पेचप्रसंग निर्माण झाला होता तो सोडविण्यासाठी राजकीय शक्तींची पुनर्रचना घडवून आणणाऱ्या प्रक्रियांना वाव देणे आवश्यक होते. अर्थात् जगजीवनरामबाबू हे दलित जमातींचे पुढारी आहेत ह्या गोष्टीला काही महत्त्व आहे. ते दुर्लक्षित करणे योग्य होणार नाही आणि येत्या निवडणुकीत तिला महत्त्वाचे स्थान राहील. तरीही ह्या दोन्ही प्रसंगी ज्या अधिक व्यापक राजकीय प्रक्रियांमध्ये विच्छेद निर्माण करण्यात आला त्यांच्यावर भर देणे योग्य ठरेल.

१९७५ मध्ये जर श्रीमती गांधी यांनी न्यायालयाचा निकाल मान्य केला असता आणि काँग्रेस संसदीय पक्षाला मोकळेपणे मतदान करू दिले असते तर जगजीवनरामबाबू किंवा श्री. चव्हाण ह्या दोघांमधून कुणीतरी नेता म्हणून निवडून आला असता. (जगजीवनरामबाबू निवडून येणे बहुधा अधिक संभवनीय होते.) आणि ह्या घटनेतून राजकीय शक्तींची नव्या प्रकारे पुनर्रचना होण्याच्या प्रक्रियेला प्रारंभ झाला असता. त्यावेळी राजकीय जीवनात काँग्रेस पक्ष जरी वरचढ होता तरी तो विस्कळित व्हायला लागला होता. त्याच्या वेगवेगळ्या घटकांना एकत्र राखणारे बंध झपाट्याने क्षीण होऊ लागले होते. त्याचप्रमाणे विरोधी पक्षांनी श्री जयप्रकाश नारायण ह्यांच्या नेतृत्वाखाली आणि इंदिरा गांधी ह्यांच्या सरकाराविरुद्ध चाललेल्या चळवळीत गोवून एका छत्राखाली आणण्याचा जरी प्रयत्न करण्यात आला होता, तरी हे पक्ष भिन्न सामाजिक हितसंबंधांचे प्रतिनिधित्व करीत होते अशीच वस्तुस्थिती होती. ह्या सर्व वेगवेगळ्या घटकांतून एक नवीन व्यूहरचना निर्माण होण्याच्या प्रक्रियेला काँग्रेस संसदीय पक्षासाठी नवीन नेता निवडण्याच्या घटनेने सुरवात झाली असती, पुढील निवडणुकीत ही रचना संघटित, स्पष्ट आणि रेखीव झाली असती आणि ही प्रक्रिया पुढेही चालू राहिली

अनुक्रमणिका

असती. आणीबाणी लादली गेल्यामुळे ही प्रक्रिया उधळली गेली, एका पूर्णपणे नवीन आणि आगन्तुक मुद्याच्या संदर्भात (आणीबाणीच्या संदर्भात) राजकीय पक्ष दोन परस्परविरोधी गोटांत विभागले गेले आणि हे दोन गोट एकमेकाविरुद्ध ठाकले आणि अशा रीतीने जनता पक्षाचा उद्‌भव झाला. जनता पक्ष हा तितकासा एक पक्ष नव्हता; तो पक्षांचा एक संघ होता. समान सामाजिक हितसंबंध एकत्र येऊन निर्माण झालेल्या राजकीय पुनर्बांधणीचे फलित म्हणून तो अस्तित्वात आला नव्हता. काही पक्ष आगन्तुकपणे एकत्र आल्याने तो बनला होता.

१९७५ च्या तुलनेने १९७९ मधील राजकीय परिस्थिती खूपच बदललेली होती. तरीही प्रसंग असे घडून आले, की १९७५ मध्ये घडून आलेल्या घटना-क्रमासारखाच काहीसा घटनाक्रम १९७९ मध्ये घडून आला. जनता पक्षात फूट पडली. शिष्टाई करणाऱ्या मध्यस्थांच्या अविरत प्रयत्नांमुळे ही फूट बराच काळ स्थगित करण्यात आली होती; पण अखेरीस ती घडून आली. ह्या फुटीमुळे आणि श्री. मोरारजी देसाई सत्तास्पर्धेच्या रिंगणातून बाजूला सरल्यामुळे राजकीय पुनर्बांधणीच्या प्रक्रियेला सुरवात करण्याची संधी सामोरी आली होती. ह्या वेळी वरचढ असलेल्या जनता पक्षातील अनेक भिन्न घटक, जनता पक्षाच्या विरोधात उभ्या असलेल्या निरनिराळ्या राजकीय शक्ती—ह्यांच्यात कॉंग्रेस-पक्षाची झालेली वेगवेगळी शकले आणि फुटून निघालेला जनता (स.) पक्ष ह्यांचा अंतर्भाव करता येईल— तसेच अनेक ठिकाणी प्रादेशिक पातळीवर नव्याने घडून आलेल्या भिन्न पक्षांच्या जुळणी, एकत्र येऊ पहाणारे डावे पक्ष, ह्या सर्वांच्या आधारे ही पुनर्बांधणी घडून आली असती. श्री. जगजीवनराम यांच्या नेतृत्वाखालील सरकारने स्थिर असा मध्यकाळ उपलब्ध करून दिला असता. ह्या अवधीत भिन्न राजकीय शक्तींच्या एकमेकींवर स्वाभाविकपणे होणाऱ्या क्रियाप्रतिक्रियांचे फलित म्हणून राजकीय शक्तींची एक नवी बांधणी निष्पन्न व्हायला अवसर मिळाला असता, आणि लोकसभेच्या पुढील निवड-णुकीत व त्यानंतर ह्या बांधणीला बरेचसे स्थिर आणि निश्चित स्वरूप प्राप्त झाले असते.

१९७५ मध्ये लादलेल्या आणीबाणीप्रमाणेच, राष्ट्राध्यक्षांनी आता केलेल्या हस्तक्षेपामुळे[१] ह्या स्वाभाविक राजकीय प्रक्रियेत विक्षेप घडून आला. सर्वांपुढे निवडणुका दत्त म्हणून ठाकल्या. वास्तविक कोणत्याही पक्षाची निवडणुकीसाठी तयारी नव्हती आणि यामुळे सर्व पक्षांवर निवडणुकीसाठी म्हणून इतर पक्षांशी संधीसाधूपणे सख्य करण्याची, तडजोडी करण्याची, कोणत्यातरी गौण मुद्यांना महत्त्व देऊन त्यांच्या संदर्भात खोटे पवित्रे सार्वजनिकपणे धारण करण्याची बहुधा पाळी येणार. ह्याचा पहिला परिणाम होतो तो असा, की लोकांपुढे ज्या खऱ्या-खुऱ्या समस्या उभ्या आहेत त्या बाजूला सारल्या जातात. शिवाय सत्ता संपादन करण्यासाठी होणारा झगडा कमालीचा तीव्र बनतो, त्याचे प्रतिबिंब सामाजिक जीवनात पडते, सामाजिक जीवन कलुषित होते, निवडणुकीला अतिशय कडवट धार प्राप्त होते आणि ह्याची परिणती दंगली आणि हिंसा घडून येण्यात होते.

हे सर्व म्हणून झाल्यानंतर,[२] निवडणुकीने निर्माण केलेल्या परिस्थितीशी खंबीरपणे मुकाबला करणे आवश्यक आहे हेही म्हटले पाहिजे. निवडणूक कितीही अवेळी आलेली असली आणि ती घेण्याच्या निर्णयामागे कोणतेही हेतू आणि अंदाज असले तरी निवडणुकीमुळे आपल्याला एक संधी मिळते. निवड करायची संधी मिळते. आणि त्याबरोबरच राष्ट्रा-पुढे ज्या व्यापक समस्या आहेत त्यांच्याविषयी फिरून विचार करण्याची संधी मिळते. ही वेळ एकमेकांवर दोषारोप करण्याची नाही; वाचाळपणे, 'राष्ट्राध्यक्षांवर महाभियोग (इंपीचमेंट) भरू' अशी धमकी देण्याची, अमका पुढारी इंदिरा गांधीं-पुढे शरणागती पत्करेल, अमका त्यांच्या गटात सामील होईल असे आरोप करण्याचीही ही वेळ नाही. भावना भडकलेल्या आहेत, राग अनावर झाला आहे हे समजू शकते आणि असली बोलणी रागाच्या भरात होतात. पण लोकशाहीच्या मार्गाला निष्ठा वाहिलेल्या सर्व वेगवेगळ्या पुढाऱ्यांनी ह्यावेळी आपल्या मनाला आवर घालून, ह्या निव-डणुकीमुळे जे आव्हान उभे राहिले आहे, त्याला विवेकाने तोंड दिले पाहिजे.

नागरिक म्हणून आपण किती सुबुद्ध आहोत ह्याची अतिशय खडतर परीक्षा ह्या निवडणुकीत होईल. पूर्वीच्या कोणत्याही निवडणुकीत इतक्या कठीण परीक्षेला आपल्याला तोंड द्यावे लागले नव्हते. एकतर वेगवेगळ्या पक्षांत नेमक्या कोणत्या मुद्यांवर मतभेद आहे, नेमक्या कोणत्या ध्येय-धोरणांमुळे ते एकमेकांच्या विरुद्ध ठाकले आहेत हे फारसे स्पष्ट नाही. पण याहूनही एक महत्त्वाचे कारण आहे. येत्या निवडणुकीची कार्यवाही कशी होते आणि तिचा निकाल काय लागतो ह्यावर ह्या देशातील लोकशाही व्यवस्थेचे भवितव्य अवलंबून रहाणार आहे. किंबहुना लोकशाही व्यवस्था ह्या देशात टिकणार आहे की नाही हे ठरणार आहे. पूर्वीच्या कोणत्या निवडणुकीचा निकाल ह्या देशातील लोकशाहीच्या भवितव्याशी अशाप्रकारे निगडित नव्हता. सामाजिकदृष्टचा पाहता वेगवेगळ्या जातीजमातींमध्ये, तसेच शहरी व ग्रामीण विभागांतील वेगवेगळ्या गटांमध्ये राजकीय सत्तेच्या विभागणीवरून जे मूलभूत तणाव आणि झगडे आहेत ते ह्या निवडणुकीमुळे अधिक प्रखर आणि दृढ होतील. तेव्हा ह्या निवडणुकीने आपल्यापुढे एक मूलभूत आव्हान उभे केले आहे. ह्या आव्हानाचे स्वरूप असे मांडता येईल : ह्या निवडणुकीला, आतापर्यंत जी राजकीय पुनर्बांधणी अनेक कारणांमुळे खंडित झालेली आहे, ती घडवून आणण्याचे साधन आपण बनविले पाहिजे आणि ह्या पुनर्बांधणीतून काही किमान सममत ( कॉन्सेन्सस ) मूर्त करणारी एक नवीन राजकीय चौकट आपण निर्माण केली पाहिजे. हे आपल्याला कसे साधता येईल ?

हे साधण्यासाठी आपल्यापुढे जी समस्या उभी आहे तिचे नेमके स्वरूप आपण ध्यानात घेतले पाहिजे. आपल्या परिस्थितीचे आपण जे विश्लेषण करू त्याला, किंवा जबाबदार राजकीय नेते आणि विचारवंत ह्या परिस्थितीत जी कृती करू पहातील तिला ह्या आकलनाची बैठक आवश्यक आहे. भारताच्या समग्र सामाजिक-राजकीय व्यवस्थेचे परिवर्तन कसे करता येईल, बहुसंख्य भारतीय जनतेच्या गरजांच्या दृष्टीने अनुकूल ठरेल असा सामाजिक-आर्थिक विकास साधू पहाणारी धोरणे नव्याने विकसित करायची असतील तर कोणत्या प्रकारची चौकट निर्माण करावी लागेल ह्या प्रश्नांचा विचार मी ह्या लेखात करणार नाही.[३] ह्या प्रश्नांचा खोल जाऊन विचार करावा लागेल. हे अत्यंत महत्त्वाचे प्रश्न आहेत आणि एक राष्ट्र म्हणून ज्या प्रश्नांविषयी आपण अगत्याने विचारविनिमय केला पाहिजे, त्यांत ह्या प्रश्नांना आपण अग्रस्थान दिले पाहिजे. हे सर्व खरे आहे; पण दुर्दैवाने आजघडीला आपल्यापुढे एक राजकीय पेचप्रसंगच उभा आहे. आणि त्याच्याशी मुकाबला करणे आवश्यक आहे. कारण आज राजकीय चौकटच ढासळल्यासारखी झाली आहे व काही प्रमाणात तरी कार्यक्षमतेने, सुसंगतपणे, निपुणतेने व्यवहार करू शकणारी चौकट परत उभी केल्याशिवाय आर्थिक परिवर्तनाचे आणि सामाजिक पुनर्रचनेचे जे अधिक व्यापक प्रश्न देशासमोर उभे आहेत त्यांच्यकडे वळता येणार नाही. ह्या प्रश्नांचे महत्त्व आपण कमी लेखतो आहो असा ह्या म्हणण्याचा अर्थ नाही. आपले म्हणणे एवढेच आहे, की आर्थिक व सामाजिक सुधारणा घडवून आणू पहाणाऱ्या नवीन धोरणांची अंमलबजावणी, सुस्थिर अशा शासनयंत्रणेच्या चौकटीतच करता येणे शक्य असते.

आपल्या राजकीय व्यवस्थेत जो पेचप्रसंग निर्माण झाला आहे त्याची उत्पत्ती १९६७ च्या निवडणुकीत शोधली पाहिजे. ज्याला भारताचा राजकीय शासकवर्ग म्हणता येईल त्याच्यात वेगवेगळ्या प्रमाणात सामील असलेले जे सामाजिक गट होते, ह्या वर्गाचे जे सामाजिक अधिष्ठान होते त्याच्यात फेरबदल होण्याची सुरवात १९६२ च्या निवडणुकीत झाली. (ह्या निवडणुकीनंतर लवकरच चिनी युद्धात झालेला बोजवारा घडून आला आणि ह्या खंडप्राय देशातील गुंतागुंतीच्या लोकशाही व्यवस्थेत पं नेहरूंचे ज एकमेवाद्वितीय स्थान होते त्याला तडे गेले.) ह्या गोष्टींनी सुरू केलेल्या प्रक्रियांची परिणती १९६७ च्या निवडणुकीत झाली. ही निवडणूक अनेक दृष्टींनी महत्त्वाची आहे. नेहरूंच्या मृत्यूनंतर झालेली ती पहिली निवडणूक होती. काँग्रेसच्या कारकीर्दीविरुद्ध जो रोष साचत आला होता तो ह्या निवडणुकीत पहिल्यांदा उघडपणे आणि व्यापक प्रमाणावर व्यक्त झाला होता. भारतीय मतदारांच्या फार मोठ्या संख्येला, विशेषतः ग्रामीण मतदारांना, ह्या निवड-



अनुक्रमणिका

णुकीला सामाजिक महत्त्व, अर्थ आहे अशी जाणीव असल्याचे दिसून येत होते. विशेषतः खालच्या जातींनी स्वतःचा असा नेट धरायला सुरवात केली होती आणि घाऊक 'मत-पेढयांची' जी मगरमिठी त्यांच्याभोवती तोपर्यंत पडली होती, तिचा विळखा त्यांनी काहीसा सैल केला होता. सरकार, काँग्रेसपक्ष आणि त्याचे पुढारी ह्यांच्याविषयी आदरभाव बाळगला पाहिजे, त्यांचा मान राखला पाहिजे, त्यांच्याविषयी मुर्वतीने बोलले पाहिजे अशी एकेकाळी लोकांची असलेली वृत्ती ह्या निवडणुकीच्या वेळेपर्यंत लोपत आली होती. आता त्यांच्यावर परखडपणे टीका होऊ लागली होती, आगपाखड करण्यात येऊ लागली होती, ते टिंगलीचे विषय झाले होते. शिवाय, ह्या वेळेपर्यंत वेगवेगळचा जातींमध्ये चाललेले अंतर्गत झगडे आणि त्यांचे परस्पराशी होणारे झगडे निवडणुकीच्या आखाडचात निश्चितपणे शिरले होते. सत्तेत योग्य तो सहभाग मिळविण्यासाठी, तसेच वरिष्ठ जातींचे पूर्वापार चालत आलेले श्रेष्ठ स्थान, त्यांच्या हातात केंद्रित झालेली सत्ता ह्यांना आव्हान देण्यासाठी आपल्याला राजकारणाच्या रिंगणात उतरणे भाग आहे असे वेगवेगळचा जाती-जमातींच्या गटांना दिसून आले होते.

१९६७ नंतर, राजकीय जीवनातील ह्या शक्तींचे बळ वाढले आहे; आणि ह्याचा परिणाम असा झाला आहे, की वेगवेगळे पक्ष, त्यांची छकले, त्यांच्या युती ह्यांच्यामध्ये सत्तेसाठी चाललेल्या झगडचांचे माध्यम एवढेच लोकशाही प्रक्रियांचे स्वरूप उरलेले नाही; प्रस्थापित, वरचढ आणि वंचित जमातींमध्ये चाललेल्या झगडचांचेही, लोकशाही प्रक्रिया हे, माध्यम बनले आहे. पक्षांमध्ये सत्तेसाठी चाललेली स्पर्धा आणि जातीजमातीमध्ये चाललेली स्पर्धा ह्या भिन्न प्रक्रिया आता एकवटल्या आहेत आणि प्रस्थापित व्यवस्थेच्या बाजूला असलेल्या शक्ती आणि परिवर्तनाच्या बाजूच्या शक्ती ह्यांच्यामधील सामना हे स्वरूप त्यांना प्राप्त झाले आहे. भारतातील बहुसंख्य मतदारांनी परिवर्तन घडवून आणण्याचे साधन म्हणूनच निवडणुकीकडे नेहमी पाहिलेले आहे; काँग्रेसची सद्दी अगदी बळकट होती तेव्हाही त्याच्या बाजूने बहुसंख्य मते कधी पडलेली नव्हती. १९६७ नंतर ही परिवर्तनाची इच्छा अधिक जाणीवपूर्वक बाळगण्यात येत आहे, आणि राजकीय प्रक्रियांकडे परिवर्तनाचे माध्यम म्हणून जाणीवपूर्वक पहाण्यात येत आहे. ह्याचा एकंदर परिणाम म्हणून असे आढळून येते, की प्रस्थापित व्यवस्थेविरुद्धचा असंतोष आणि ह्या व्यवस्थेचे प्रतिनिधित्व करणाऱ्या मंडळीविषयीची नापसंतीच निवडणुकांतून प्रामुख्याने व्यक्त होत आलेली आहे. (१९६७ मध्ये काँग्रेसविरुद्ध गेलेले मतदान, १९७१चे 'प्रस्थापिता' विरुद्ध झालेले मतदान, म्हणजे काँग्रेसचे दादालोक आणि 'ग्रँड अलायन्स' विरुद्ध झालेले मतदान, १९७७ मध्ये आणीबाणीविरुद्ध झालेले मतदान.)

ही जी बदलाची इच्छा राजकीय पातळीवर व्यक्त होत आली आहे ती सामाजिक बदलावर आधारलेली आहे. सामाजिक शक्तींची एक मूलतः वेगळी अशी जुळणी घडून आली आहे. आर्थिक, सामाजिक, राजकीय सत्तेच्या विभागणीची जुनी व्यवस्था संपुष्टात आली आहे आणि ह्या स्थित्यंतराची संवेदनशीलतेने दखल घेईल, तिला प्रतिसाद देईल अशी नवी व्यवस्था घालून देण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे ह्याचे हा विशिष्ट राजकीय आविष्कार हे एक चिन्ह आहे. काँग्रेसच्या आधिपत्याखाली जी राजकीय व्यवस्था निर्माण झाली होती, तिने देशाला जवळजवळ वीस वर्षे एक स्थिर अशी राजवट दिली आणि काही राष्ट्रीय उद्दिष्टे साधण्याची धडपडही ह्या राजवटीने केली असे एकंदरीत म्हणता येईल. पण ही राजकीय व्यवस्था एका विशिष्ट सामाजिक समतोलावर आधारलेली होती; पण हा समतोल १९६७ च्या सुमारास ढासळत आला होता; स्थिर राजकीय व्यवस्थेला आधार द्यायला तो असमर्थ ठरू लागला होता. काँग्रेस पक्ष हा स्वातंत्र्याच्या चळवळीचा वारसदार होता. राष्ट्रीय चळवळीने शहरी व ग्रामीण विभागातील अनेक भिन्न सामाजिक गटांचा पाठिंबा मिळविलेला होता. आणि समाजाच्या अनेक थरांत अस्पष्टपणे पसरलेल्या ह्या व्यापक पाठिंब्याचा वारसाही काँग्रेसला लाभला होता. म्हणून काँग्रेसच्या राजवटीला व्यापक लोकमान्यतेचा आधार होता. आपल्या सत्तेचे हे अधिष्ठान काँग्रेसने दुहेरी मार्गाने बळकट केले. एकतर नवीन कायदे करून जनतेच्या कित्येक विभागांचा पाठिंबा काँग्रेसने मिळविला. दुसरी




गोष्ट अशी, की प्रादेशिक पुढाऱ्यांच्या द्वारा स्थानिक पातळीवर देवाणघेवाण करून अनेकांना सत्तेत हिस्सा दिला आणि कॉंग्रेसमध्ये गोवून घेतले. अशा स्थानिक रचना करून निवडणुकीसाठी एक कार्यक्षम यंत्रणा उभारण्यासाठी आवश्यक असलेली मोकळीक कॉंग्रेसने प्रादेशिक बॉसिसना दिली. जमीनदारी नष्ट करणारे, कुळांना काही अधिकार देणारे, जमीन-धारणेवर मर्यादा घालणारे कायदे करून कॉंग्रेसने एक भक्कम ग्रामीण बैठक प्राप्त करून घेतली. कारण, मध्यम आणि कनिष्ठमध्यम जातीतील जमीनमालक, मोठी कुळे आणि खंडाने जमीन कसणारे शेतकरी, तसेच ह्या जातीतील लहान शेतकरी ह्या साऱ्यांशी ह्या कायद्यांच्या द्वारे कॉंग्रेसला दुवे जोडता आले.

वरिष्ठ आणि मध्यम शेतकऱ्यांच्या पाठिंब्याची ही जी बैठक कॉंग्रेसने कमावली होती तिच्यात, ज्यांना सर्वसाधारणपणे वंचित जमाती मानता येईल अशा सामाजिक थरांतल्या मोठ्या लोकसंख्येच्या पाठिंब्याचीही भर कॉंग्रेस पक्ष घालू शकला. उदा., दलित जाती आणि जमाती, अल्पसंख्य जमाती, ग्रामीण विभागातील मागासलेल्या जातीतील गरीब गट, इ. नोकऱ्यांत काही प्रमाण दलितांसाठी राखून ठेवण्याची तजवीज, खास मतदारसंघांची योजना, निवडणुकांत काही जागा ह्या गटांना देणे, पक्षाच्या स्थानिक समितीत ह्या गटांच्या पुढाऱ्यांना स्वीकृत करून घेणे, ह्या स्वरूपाच्या कल्पक कारवाईमुळे कॉंग्रेसला हे साधता आले. अशा रीतीने स्थानिक समाजात श्रेष्ठत्व--कनिष्ठत्वाचे जे पूर्वापार चालत आलेले संबंध होते, वरचढ वर्ग आणि त्यांच्यावर अवलंबून असलेले कनिष्ठ वर्ग अशी जी सामाजिक रचना होती, तिला धक्का न लावता, तिच्यात बिघाड न माजविता कॉंग्रेसने ग्रामीण विभागात सत्तेची एक भक्कम, घनदाट वीण रचली. शहरी क्षेत्रातही कॉंग्रेसने ह्याच मार्गाचा अवलंब केला. मजूरांसाठी प्रागतिक कायदे करून कॉंग्रेसने कामगारवर्गाच्या अनेक विभागांना आपलेसे करून घेतले; पण ह्याबरोबरच उच्च आणि मध्यम जातीतील व्यावसायिक राजकारणी मंडळींचा स्थानिक पक्षयंत्रणेवर जो कबजा होता तो तसाच राहू दिला.

सत्तेत सहभाग देण्याची ह्या स्वरूपाची व्यवस्था फार काळ टिकणे शक्य नव्हते. विशेषतः ती ज्या राजकीय प्रक्रियेवर आधारलेली होती तिचे स्वरूप खुल्या स्पर्धेचे होते, आणि ती स्वभावतः गतिशील आणि अंतर्विरोधात्मक होती ही गोष्ट ध्यानात घेतली तर अशी व्यवस्था टिकून रहाणे का शक्य नव्हते हे सहज समजून येईल. काही जातींच्या वरचढपणावर आधारलेली ही जी चौकट होती, तिचे टिकून रहाणे कनिष्ठ जातींनी ह्या जातींचा वरचढपणा स्वेच्छेने मान्य करण्यावर तर अवलंबून होतेच पण शिवाय कनिष्ठ जाती कायमच्या वंचित रहाण्यावरही अवलंबून होते. ही वस्तुस्थिती स्पष्टपणे अंतर्विरोधात्मक आहे. मध्यम थराच्या जातीतील शेतकऱ्यांची सत्ता दृढ झाल्यावर जमीनविषयक कायद्यात पुढे सुधारणा करण्यात मोडा घालण्यात आला, तळच्या जातीतील लहान कुळांना जमिनीवरून हुसकावून लावण्यात आले, किंवा खंडाने शेती करून आपल्या उत्पन्नात त्यांना भर घालता येईनाशी झाली, व स्वतःच्या मालकीच्या जमिनीच्या लहान तुकड्यावर गुजराण करणे भाग पडू लागले. यापेक्षाही वाईट गोष्ट अशी, की जमीनमालक असलेल्या जातींनी झपाट्याने हस्तगत केलेल्या सत्तेचा उन्माद त्यांना चढल्यासारखा झाला-'हरित क्रांती'मुळे सत्ता केंद्रित करण्याची प्रक्रिया अधिकच वेगाने घडून आली—आणि उच्च पातळीवरील कॉंग्रेस नेत्यांनी सर्व जातीजमातींना सामावून घेण्याचा जो पवित्रा धारण केला होता त्याला विरोधी ठरेल अशा रीतीने ह्या सत्तेचा वापर ह्या नवीन, स्थानिक सत्ताधाऱ्यांनी केला. ह्यामुळे राष्ट्रीय पातळीवर सर्वांच्या सहभागाने जो एक समझौता झाला होता त्याचा पाया स्थानिक पातळीवर ढासळू लागला. तळाच्या जाती रुष्ट झाल्या. कॉंग्रेसच्या नेतेमंडळीशी असलेल्या दिलजमाईची जागा चिडीने घेतली. जमीनकायद्यात सुधारणा करण्याचे आपले दीर्घकालीन वचन कॉंग्रेसने पाळले नव्हते किंवा ग्रामीण विभागात रोजगार वाढविण्याच्या उद्दिष्टाने ज्या योजना किंवा कार्यक्रम आखले होते त्यांचीही अंमलबजावणी केली नव्हती. ही तर वस्तुस्थितीच होती.

अनुक्रमणिका

विशिष्ट जातींच्या वरचष्म्यावर आधारलेली स्थानिक रचना आणि वरच्या पातळ्यांवरील काँग्रेसची राजवट यांच्यात निकटचा संबंध आहे ही जाणीव १९६७ च्या सुमारास तळच्या जातींच्या गटांना झाली. स्थानिक स्थितीविषयीची त्यांची जी निराशा होती तिचे रूपांतर त्यांनी काँग्रेसच्या राजवटीला दिलेल्या आव्हानात केले. काँग्रेसचा निषेध करण्यासाठी म्हणून जे मतदान झाले त्याचा लाभ स्वतंत्र पक्षापासून तो सं. समाजवादी पक्ष, काँग्रेसची वेगवेगळी छकले, अनेक प्रादेशिक पक्ष, वन्य जमाती आणि तळच्या जाती ह्यांचे प्रतिनिधित्व करू पहाणारे पक्ष यांच्यापर्यंत सर्वांना झाला. पण ह्या विरोधी मतदानाचा केंद्रबिंदू दुहेरी होता. स्थानिक पातळीवर काँग्रेसने जे घडवून आणले होते आणि जे घडवून आणण्यात कुचराई केली होती त्याविषयीचा असंतोष हा त्याचा एक घटक होता; दुसऱ्या पातळीवरील सर्व-समावेशक असा काँग्रेस-विरोध हा त्याचा दुसरा घटक होता. निवडणुकीत काँग्रेसची अर्ध्याहून अधिक राज्यात दुर्दशा झाली; ह्या राज्यांत तिच्या हातून सत्ताच गेली. पण याहूनही अधिक महत्त्वाची गोष्ट अशी, की काँग्रेसने एका विशिष्ट राजकीय व्यवस्थेचे पोषण केले होते. ह्या राजकीय व्यवस्थेत राजकीय सत्ता आणि तिचे अधिष्ठान असलेली सामाजिक बैठक यांच्यामध्ये अनुरूपता, सुसंगती होती. ह्या राजकीय व्यवस्थेला ह्या निवडणुकीने कायमचा हादरा बसला. ह्यामुळे लोकसभेमध्ये जरी काँग्रेसने आपले बहुमत टिकवून धरले होते, तरी ह्या बहुमताला स्पष्ट असे कोणतेही अधिष्ठान उरले नव्हते. सत्तेची सामाजिक बैठक आणि तिच्यावर आधारलेली सत्तेची रचना ह्या दोहोंमध्ये ओळखू येण्याजोगे कोणतेही सुव्यवस्थित नाते राहिले नव्हते. राजकीय सत्तेचे अधिष्ठान असलेली सामाजिक रचना आणि काँग्रेसने समाजाच्या भिन्न विभागांत जो समतोल घडवून आणून त्याच्यावर आपले प्रभुत्व आधारले होते तो समतोल, ह्या दोहोंमध्ये पडलेली मूलभूत दरी १९६७ च्या निवडणुकीने स्पष्ट झाली.

ह्यानंतर एका मूलभूत अर्थाने भारतीय राज्यव्यवस्था सुकाणू नसलेल्या नावेसारखी प्रवाहात हेलकावत वहात आहे असे मूलभूत अर्थाने म्हणता येईल. पण ज्या कारणांमुळे हे घडून आले आहे ती कारणे दूरवर विचार करता विधायक स्वरूपाची आहेत, विघातक नाहीत असेच दिसून येईल. मतदारांनी मतदान करण्याची प्रक्रिया घेतली तर, ह्या पातळीवर मतदारांनी पूर्वापार चालत आलेल्या सामाजिक संबंधांच्या मानसिक जोखडातून स्वतःला मोकळे करून घेतले आहे असे आढळते. ह्या संबंधांना जागले पाहिजे, जो पोशिंदा आहे त्याच्याशी इमान राखले पाहिजे ही जी मनोवृत्ती पूर्वीच्या निवडणुकीतील मतदानात प्रतिबिंबित होत होती, ती आता उरलेली नाही. ह्याचे कारण असे, की त्यांचे व आपले हितसंबंध वेगळे आहेत ही जाणीव निर्माण झालेली आहे आणि त्याबरोबरच आपल्या हितसंबंधांना अनुकूल, पोषक अशी राजकीय कृती आपण उभारू शकतो, ही कुवत आपल्या ठिकाणी आहे असा आत्मप्रत्यय ह्या थरांना आलेला आहे—थोडक्यात लोकांना त्यांच्या राजकीय हक्कांची कल्पना आलेली आहे.[५] राजकीय पक्षव्यवस्था, सत्तेसाठी ह्या पक्षांची होणारी जुळणी ही पातळी घेतली तर तेथेही काही नाट्यमय बदल झालेले आढळून येतात. हे बदल राजकारणाच्या शैलीतही झाले आहेत आणि राजकीय व्यासपीठावरून लोकांना उद्देशून होणाऱ्या वक्तव्यांच्या आशयातही झाले आहेत. ही शैली आता सुस्पष्टपणे 'आयडियालॉजिकल' बनली आहे. म्हणजे विशिष्ट, सर्वंकष सामाजिक–राजकीय तत्त्वज्ञानावर आधारलेल्या विचारसरणीचे अधिष्ठान राजकीय कार्यक्रमाला आणि डावपेचांना देण्यात येत आहे. आणि वक्तव्यांच्या आशयाचे स्वरूप सुस्पष्टपणे आर्थिक बनले आहे.

काँग्रेसपासून फुटून निघालेल्या विभागाने प्रविष्ट केलेले हे 'नवीन राजकारण' होते. (ह्या विभागाला लवकरच 'नवीन' काँग्रेस म्हणून ओळखण्यात येऊ लागले.) ह्या राजकारणाची कल्पना, इंदिरा गांधी यांनी, मोठ्या धडाडीने आखली आणि त्याचे डावपेचही मोठ्या तल्लखपणे रचले. ह्या एक नवीन इंदिरा गांधी होत्या. ह्यापूर्वी बराच काळ स्वतःचे असे नेतृत्व निर्माण करण्याची त्यांची धडपड चालली होती. मागे काँग्रेसच्या अध्यक्ष म्हणून जेव्हा त्यांना प्रमुखपद लाभले होते पण असे असूनही

पक्षावर त्यांची हुकमत नव्हती त्या वेळेपासून ह्या घडपड्रीला सुरवात झाली होती असे म्हणता येईल. पण त्यांच्या वडिलांनीच जे सांघिक नेतृत्व निर्माण केले होते आणि ज्याचा वारसा आपल्यामागे ठेवला होता त्यानेच त्यांचे हातपाय जखडून टाकले होते.

भारतीय समाजाच्या आजच्या 'राजकीय संस्कृती'त परस्परविरुद्ध दिशांनी खेचणाऱ्या ज्या प्रवृत्ती आहेत त्या समजून घेण्यासाठी आणि राजकीय व्यवस्थेत आज जो पेचप्रसंग घडून आला आहे त्याच्याशी मुकाबला करण्यासाठी, एक राजकीय घटना म्हणून इंदिरा गांधींची ओळख पटवून घेणे आवश्यक आहे. लोकांची मनस्थिती, त्यांचा 'मूड', इंदिरा गांधींनी जुन्या काँग्रेसच्या नेतृत्वापेक्षा अधिक चांगल्या प्रकारे हेरला आणि त्याच्यावर काबू मिळवून स्वतःच्या वैयक्तिक राजकीय प्रभुत्वासाठी त्याचा त्यांनी वापर केला. प्रस्थापिताला विरोध करण्याच्या पवित्र्यात लोक खडे होते आणि काँग्रेसचे नेतृत्व हे तोपर्यंत ह्या विरोधी भावनेचे लक्ष्य होते. पण ह्या नेतृत्वाविरुद्ध होणाऱ्या उठावाचे, त्याला देण्यात येणाऱ्या आव्हानाचे, इंदिरा गांधी ह्या स्वतःच प्रतीक बनल्या; गरिबांची कैवारी, त्यांच्यावतीने झुंजणारी अशी स्वतःची प्रतिमा त्यांनी लोकांपुढे खडी केली आणि ही भावना स्वतःला अनुकूल करून घेतली. पण ह्याबरोबरच, काँग्रेसच्या फुटून निघालेल्या बहुसंख्य विभागाचे नेतृत्व त्यांनी केले आणि काँग्रेस कबजात घेतली, वडिलांच्या राजकीय नेतृत्वाचा वारसा स्वतःकडे आला आहे असा दावा पुढे केला आणि ह्या मार्गाने काँग्रेसच्या जुन्या राजवटीत आणि स्वतःच्या नेतृत्वात सातत्य निर्माण करून, शहरी व ग्रामीण विभागातील उच्च जाती आणि बडे उद्योगपती ह्यांचा पाठिंबा मिळविला.

ही गोष्ट त्यांनी अनेक मार्गांनी साधली. लोकांच्या मनाला जाऊन भिडेल, लोकांशी आपण एकरूप झालो आहो असे ज्याच्यामुळे त्यांना वाटेल अशा वक्तृत्वाचा, जाणीवपूर्वक अस्पष्ट, संदिग्ध ठेवलेल्या पण लोकांच्या भावना ज्याच्यात उत्कटपणे प्रतिबिंबित करणाऱ्या जनवादी (पॉप्युलिस्ट) वक्तृत्वाचा वापर त्यांनी केला आणि ह्या वक्तृत्वावर आधारलेल्या एका अनिश्चित पण अतिजहाल भूमिकेद्वारे लोकांना त्यांनी आवाहन केले. ( उदा. गरिबी हटाव ! ); 'समाजवाद' जलदीने आणण्यासाठी नाट्यपूर्ण हालचाली केल्या (उदा. बँकांचे राष्ट्रीयीकरण ); सामाजिक दृष्ट्या वंचित पण राजकीय दृष्ट्या महत्त्वाच्या असलेल्या गटांना स्वतःकडे खेचून, त्यांनी स्वतःशी एकरूप व्हायला लावले पण हे करीत असताना, राजकीय सत्तेचा वापर करून देशाला खंबीर नेतृत्वाची आणि बळकट केंद्रसरकारची गरज आहे ह्या गोष्टीवर भर दिला. आता मागे वळून पाहिले असताना असे दिसते, की ह्या शेवटल्या गोष्टीवरच त्यांनी आपले प्रयत्न केंद्रित केले होते; बाकीच्या साऱ्या गोष्टी वक्तृत्वाच्या, लोकांना आकर्षून घेण्यासाठी केलेल्या चलाखीच्या पातळीवरच राहिल्या. राष्ट्रीय आणि प्रादेशिक पातळीवरच्या आपल्या अनेक सहकाऱ्यांच्या नेतृत्वाची प्रतिष्ठा त्यांनी पद्धतशीरपणे कमकुवत केली; रेल्वे संप किंवा तेलंगणातील उद्रेक यांसारखे जनतेचे उठाव दडपून टाकले, भारतीय संघराज्याच्या रचनेला आपल्या इच्छेप्रमाणे वाकविले आणि भारतीय उपखंडात आणि आंतरराष्ट्रीय क्षेत्रात एक महासत्ता अशी भारताची प्रतिमा प्रक्षेपित केली. ह्या मार्गांचा अवलंब करून आणि त्यांना आपल्या वक्तृत्वाची जोड देऊन थोड्याच अवधीत त्यांनी आपल्या नानाविध भूमिका जनमानसात प्रस्थापित केल्या: बहुजनसमाजाच्या त्या संरक्षक ठरल्या; बडे उद्योगपती आणि व्यापारपती यांच्या साहाय्यक दोस्त बनल्या; आणि शहरी मध्यमवर्गाच्या मोठाल्या विभागांच्या स्वाभाविक नेत्या ठरल्या. कारण मध्यमवर्गाच्या ह्या विभागांची, लोकशाही व विकेंद्रित राजकारणाविषयी एकंदरीत संशयाची वृत्ती आहे; आपला अधिकार समर्थपणे वापरणाऱ्या बळकट केंद्र सरकारची त्यांना लालसा आहे.

ह्यातून एक विलक्षण मिश्रण तयार झाले. जनवाद (पॉप्युलिझम) हा त्याचा एक घटक होता; एका व्यक्तीच्या ठिकाणी सर्व अधिकार मूर्त आणि केंद्रित झालेले असण्याची परिस्थिती हा दुसरा घटक होता. आणि अहंकारी आणि आक्रमक राष्ट्रवादी वृत्ती हा तिसरा घटक होता. ह्या मिश्रणातून इंदिरा गांधींचे 'आधुनिक' नेतृत्व उदयाला आले. पक्षीय राजकारणात अनुस्यूत असलेल्या गटबाजीच्या पलीकडचे असे हे नेतृत्व

होते. प्रचाराच्या आधुनिक साधनांचा अत्यंत परिणामकारक उपयोग करून सामाजिक दृष्ट्या वंचित असलेल्या वर्गांत निष्ठेची आणि कृतज्ञतेची भावना निर्माण करण्यात ते यशस्वी झाले होते. हळूहळू दृढ होत जाणाऱ्या आणि विस्तार पावणाऱ्या लोकशाही प्रक्रियांना थोपवून धरायला आपण असमर्थ आहोत ह्या जाणिवेने असुरक्षित बनलेल्या मध्यमवर्गाच्या अहंकारी आकांक्षांचे– आणि त्यांच्या प्रस्थापित हितसंबंधांचे–हे नेतृत्व प्रतीक बनले; ज्याच्याशी हा वर्ग सहजपणे एकरूप होऊ शकत होता असे हे नेतृत्व होते.

नेतृत्वाची जे "दैवी वरदान" ( कॅरिस्मा ) इंदिरा गांधींना लाभले आहे त्याचे मूळ ह्या मिश्रणात आहे. हे दैवी नेतृत्व दुहेरी पायावर आधारलेले आहे. सामाजिक उतरंडीच्या तळाशी असलेल्या वर्गांचे जे 'राजकारणीकरण' झालेले आहे त्याला अनुरूप ठरेल अशा रीतीने स्वतःच्या राजकीय सत्तेचे सामाजिक अधिष्ठान बदलण्यात काँग्रेस पक्षाला आलेले अपयश हा त्याचा एक पाया आहे. उलट, ह्या तळच्या सामाजिक वर्गांच्या नव्या जाणिवेचे आयुध असलेली, आणि काँग्रेसला एक टिकाऊ आणि विश्वसनीय पर्याय ठरेल अशी जहाल राजकीय संघटना उभारण्याची विरोधी पक्षांच्या फळीची जी असमर्थता प्रकट झाली आहे तो त्याचा दुसरा पाया आहे. जनतेच्या आकांक्षा आणि सत्ताधारी वर्गाची तुटपुंजी कृती, अकर्तेपण ह्यांच्यामधील रुंदावत चाललेल्या दरीवर हे नेतृत्व उभारले होते. व्यापक आणि मूलगामी बदल घडवून आणण्यात येईल ह्या वचनाची साथ ह्या नेतृत्वाला होती. ही दरी बुजविण्याची, वचनांची पूर्ती करण्याची शक्ती केवळ एकाच व्यक्तीच्या ठिकाणी आहे ह्या दर्शनाचे अधिष्ठान त्याला होते.

हे 'बोनापार्टिस्ट' आवाहनाचे नमुनेदार उदाहरण होते–एकाचवेळी दडपलेल्यांचा, दलितांचा त्राता आणि सुसंपन्नांचा कंठमणी असा हा नेता होता; केवळ देशाच्या राज्यव्यवस्थेतच नव्हे तर राष्ट्राच्या अंतरात्म्यात निर्माण झालेली ठसठसणारी पोकळी भरून काढू शकणारी ही अवतारी व्यक्ती होती. राष्ट्राच्या दुर्दैवाने जेव्हा प्रत्यक्ष कृती करून काही घडवायची, निर्माण करायची, जनतेच्या पदरात काही पडेल अशी तजवीज करण्याची वेळ आली तेव्हा इंदिरा गांधी पूर्णपणे पोकळ ठरल्या; त्यांची फजिती उडाली. दोन मोक्याच्या आघाड्यांवर त्यांना अपयश आले. एक गोष्ट अशी, की त्या वादळावर आरूढ होऊ शकत होत्या पण वादळाला दिशा देऊ शकत नव्हत्या. १९६७ पासून ज्या 'जनवादी', विरोधी भावनांनी लोक भारून गेले होते त्यांना त्यांच्या पक्षाने १९७१ आणि ७२ च्या निवडणुकांद्वारे अधिकच वैधता, मान्यता मिळवून दिली; पण सत्तेवर आल्यानंतर, निवडणुकीत अभूतपूर्व बहुमत मिळालेले असूनसुद्धा, सामाजिक घडणीत बदल घडवून आणण्यासाठी ह्या भावनांच्या शक्तीचा उपयोग करायला तो असमर्थ ठरला. आणि त्यानंतर लवकरच आंदोलनाची आणि 'प्रत्यक्ष कृती'ची एक नवीन लाट उसळली, आणि जनतेमधील असंतोष बाहेर आला.

दुसरी गोष्ट अशी की इंदिरा गांधी आणि त्यांचे सरकार काही घडवायला, साधायला असमर्थ ठरले. हे त्यांचे सर्वांत मोठे अपयश होते. जनवादी उद्रेक किंवा विद्यार्थी आणि शिक्षक ह्यासारख्या आवाज उठविणाऱ्या, मुखर नागरी विभागांचा उद्रेक यांना तोंड देण्याचा एकच खरा मार्ग असतो आणि तो म्हणजे आपण परिस्थितीत खरीखुरी सुधारणा घडवून आणीत आहोत असे त्यांना दाखवून देणे, जहाल वक्तृत्वाला विशिष्ट, परिणानकारक उपाययोजनांची साथ देणे हा होय. पण असे घडले नाही. अनेकविध घटकांना सामावून घेणाऱ्या भारतासारख्या विशाल राज्यव्यवस्थेच्या चौकटीत, गुंतागुंतीच्या राजकीय–शासकीय यंत्रणेकडून विशिष्ट उद्दिष्टे साधली जायची असतील आणि लोकांच्या गरजा–आकांक्षांचे समाधान व्हायचे असेल –इंदिरा गांधींच्या वडिलांच्या अमदानीत हे घडत असे– तर कोणत्या प्रक्रियांचा अवलंब करावा लागतो ह्याचे आकलन इंदिरा गांधी आणि तिला साथ देणारी जहाल मंडळी यांना नव्हते. हे साधण्यासाठी भिन्न घटकांना एकत्र आणून त्यांची संयुक्त फळी उभारावी लागते, ज्याच्यात सर्व सहभागी असतील असे काही किमान एकमत (कॉन्सेन्सस) घडवून आणावे लागते. पण इंदिरा गांधींनी ह्या प्रक्रियांनाच खीळ घातली. सत्तेचा निरंकुशपणे आणि चढेलपणे वापर केला; ज्यांना लोकांत पाळे-

मुळे होती, राजकीय अधिष्ठान होते अशा नेत्यांना बाजूला सारून त्यांच्या जागी तोंडपुजा मंडळींची स्थापना केली, पक्षाची यंत्रणा जवळजवळ नष्ट करीत आणली, संघराज्य आणि प्रादेशिक राज्यांची जी शासकीय घडण रुजत आली होती ती मोडीत काढली, विकृत भयगंडापायी सार्वजनिक जीवनाच्या मूलभूत दंडकांची अवहेलना केली, केवळ राजकारणाच्या खेळाच्या नियमांचाच नव्हे तर कायद्याच्या साध्या तजविजींचा, साध्या औचित्यांचा सरळसरळ भंग केला. अनेक चौकशी आयोगांनी ह्या गोष्टी आता दाखवून दिल्या आहेत. भ्रष्टाचार फोफावला, सार्वजनिक अधिकारपदे वैयक्तिक आणि कौटुंबिक उद्दिष्टांसाठी वापरण्यात येऊ लागली, पंतप्रधानांच्या कार्यालयातून आणि घरातूनही निघणाऱ्या दुराग्रही आदेशांनी शासनयंत्रणा जखडली गेली, आणि हे सारे घडत असताना अर्थव्यवस्था कुंठित झाली, किंमती वाढू लागल्या जीवनावश्यक वस्तूंचा पुरवठा कमी होऊ लागला, काळा बाजार करणाऱ्यांना कुरण मोकळे झाले आणि लोकांची स्थिती बिघडत गेली.[६]

'जनवादी' वक्तृत्वाला जेव्हा लोकांची स्थिती सुधारण्यासाठी केलेल्या निश्चित आणि परिणामकारक कृतीचे पाठबळ नसते आणि लोकांतील असंतोष जेव्हा अधिकच भडकत रहातो, तेव्हा सरकारच्या हाती असलेल्या हिंसक बळाचा उपयोग करणे आणि दडपशाहीच्या आणि दहशतीच्या तंत्राचा अधिकाधिक वापर करणे एवढाच मार्ग उपलब्ध रहातो. ह्यातून निर्माण झालेल्या 'अधिकारवादी' राजकीय शैलीचा आणि सत्ता काबूत ठेवण्याच्या पद्धतीचा—आणि ही शैली आणि पद्धती आणीबाणीपूर्वीच आकाराला आली होती आणि आणीबाणीत तिचा फक्त पुरेपूर आविष्कार झाला हे नमूद केले पाहिजे—उपयोग दोन मूलभूत समस्यांना तोंड देण्यासाठी होत होता. ह्या समस्या अशा की इंदिरा गांधींच्या राजवटीला समाजात पाळेमुळे सजविता आली नाहीत आणि आर्थिक आघाडीवर काही विधायक कामगिरी बजाविता आली नाही.

इंदिरा गांधी यांच्यानंतर सत्तेचा वारसा ज्यांना मिळाला—म्हणजे जनता पक्ष—त्यांना, एक राजकीय नेता म्हणून इंदिरा गांधी ह्यांना जे अपयश आले आणि राजवटीचा एक प्रकार म्हणून आणीबाणी अयशस्वी का ठरली ह्याची खोल कारणे उमगली नाहीत. १९७१ मध्ये इंदिरा गांधींचा पक्ष जसा निषेधाच्या आणि रागाच्या लाटेवर आरूढ होऊन सत्तेवर आला होता तसाच जनता पक्षही नंतर सत्तेवर आला; फक्त ह्यावेळेला ह्या निषेधाचे आणि रागाचे लक्ष्य आणीबाणीची राजवट हे होते. पण आपल्याला कोणत्या मूलभूत शक्तींनी सत्तेच्या शिखरावर झोकून दिले आहे हे जसे इंदिरा गांधींना ओळखता आले नाही तसेच जनता पक्षाच्या पुढाऱ्यांनाही ओळखता आले नाही. ग्रामीण आणि नागरी गरिबांचे, विशेषतः तळच्या जाती-जमातींचे जे प्रचंड राजकारणीकरण झाले आहे त्याने जन्माला घातलेल्या शक्तींमुळे काँग्रेसने निर्माण केलेली व्यवस्था कोसळली; आणि सामाजिक हितसंबंधाची मूलभूत प्रकारे पुनर्बांधणी करणे आणि तिला अनुसरून सत्तेच्या विभागणीची एक नवीन रचना करणे आवश्यक झाले; हे बदल राज्यव्यवस्थेच्या तळाशी करणे आणि तळापासून वर करीत आणणे आवश्यक होते. आता तर आणीबाणी काढून घेतल्यामुळे आणि तिची दडपशाहीची यंत्रणा दूर केल्यामुळे ह्या शक्ती अधिकच जोमदार झाल्या आहेत आणि स्वतःच्या बळाची एक नवीन जाणीव त्यांना झाली आहे. आणीबाणी उलथून टाकून जनता पक्षाची सत्तेवर स्थापना करण्यात ह्या शक्तींनी जो भाग घेतला त्यामुळे त्यांचा हा आत्मविश्वास बळकट झाला आहे.

आपल्याला मिळालेल्या यशाचा अर्थ, जनता पक्षाच्या पुढाऱ्यांनी, 'अधिकारशाहीवर मिळविलेला विजय' असा लावला. पण हा अर्थ त्यांनी संकुचित 'उदारमतवादी' दृष्टिकोनातून लावला. म्हणजे १९७७ च्या निवडणुकीत खरोखर काय घडले हे त्यांच्या ध्यानातच आले नाही. (ह्या निवडणुकीच्या निकालाचा ते चुकीचा अर्थ लावीत आहेत असा इशारा काही विचारवंत त्यांना सतत देत आले होते. पण त्याचा उपयोग झाला नाही. ह्या विचारवंतांनी; निवडणुकीच्या निकालापासून जनता पक्षाच्या पुढाऱ्यांनी जे निष्कर्ष काढले होते त्यांच्याहून पूर्णपणे वेगळे निष्कर्ष काढले होते.) किंबहुना असे म्हणता येईल की 'अधिकारशाहीचा अंत' आणि 'लोकशाहीची पुनःस्थापना' ह्या शब्दप्रयोगांचे **जनतेने**

लावलेले अर्थ आणि जनतापक्षाने लावलेले अर्थ पूर्णपणे वेगळे होते. जनतापक्षाच्या दृष्टीने व्यक्ति-स्वातंत्र्य, आविष्कार स्वातंत्र्य ही पाश्चात्य उदार-मतवादी मूल्ये ह्या शब्दप्रयोगांनी व्यक्त होत होती; जनतेच्या दृष्टीने ही मूल्ये तर ह्या शब्दप्रयोगांनी व्यक्त होत होतीच पण आणखीही बरेच काही व्यक्त होत होते, त्यांच्या अर्थात राजकीय हक्कांबरोबर आर्थिक आणि सामाजिक हक्कही अंतर्भूत होते; आणि ह्या हक्कांना अनुसरून, सत्तेमध्ये आणि निर्णय घेण्याच्या प्रक्रियेमध्य तळच्या नागरिकांना आणि जातिजमातींना हिस्सा मिळेल अशा रीतीने, सत्तेच्या विभागणीची पुनर्रचना करणेही त्यांच्या दृष्टीने आवश्यक होते.

ही मूलभूत वस्तुस्थिती जनतापक्षाला उमगली नाही. सत्ताकेंद्रे आणि लोकशाहीची यंत्रणा राज्य-व्यवस्थेच्या अधिक खालच्या थरांपर्यंत त्यांनी नेऊन पोचविली नाहीत. त्यांनी असे केले असते तर पर-स्परविरोधी सामाजिक हितसंबंध आणि त्यांतून निर्माण होणारे झगडे राजकीय प्रक्रियांतून व्यक्त झाले असते आणि ह्या प्रक्रियांद्वारा सोडविले गेले असते. जनतापक्षाचे खरे अपयश ह्याच्यात आहे. हे सारे न झाल्यामुळे जे सामाजिक हितसंबंध रुजून बसले आहेत त्यांचा स्थानिक पातळीवरील पगडा तसाच राहिला, वरच्या काही घटकांकडून आपल्या सत्तेला त्यांनी पाठिंबा मिळविला, सरकारची दडप-शाहीची यंत्रणा आपल्या बाजूला करून घेतली आणि ह्याला जेव्हा आव्हान मिळाले तेव्हा ते बेदरकार-पणे चिरडून टाकले. पण समाजाच्या वंचित थरांना स्वतःच्या हक्कांविषयी झालेल्या नवीन जाणिवेमुळे हे आव्हान कायमच राहिले आणि त्यातून किती-तरी अधिक जालीम आणि हिंसक अशा सामाजिक झगड्यांची एक मालिकाच उद्भवली. पण त्यांच्या-कडेही जातीजातीतील किंवा भिन्न जमातीतील झगडे अशा संकुचित दृष्टीने पहाण्यात आले आणि असाच त्यांचा अर्थ लावण्यात आला. जनतापक्ष फुटण्यात ह्या साऱ्याची परिणती झाली. काँग्रेसचे जे झाले होते तेच जनतापक्षाचेही झाले. सत्तेचे लोकशाही-करण आणि विकेन्द्रीकरण करून स्वतःसाठी एक टिकाऊ सामाजिक बैठक प्राप्त करून घेण्यात जनता-पक्षाला अपयश आल्यामुळे 'सत्तेचा खेळ' शिख-राशी केंद्रित राहिला, आणि तेथे निर्माण झालेली कोंडी सोडविणे अतिशय कठीण ठरले.

काँग्रेसने निर्माण केलेल्या व्यवस्थेचा ऱ्हास, एक राजकीय शक्ती म्हणून इंदिरा गांधी यांचा झालेला उदय आणि नंतरची अवनती, जनतापक्षाच्या उद्-भवाची घटना आणि त्याचे अपयश ह्या साऱ्या-पासून एकच निष्कर्ष निघतो. तो असा की आपल्या राज्यव्यवस्थेत जो मूलभूत पेचप्रसंग निर्माण झाला आहे त्याच्यावर कोणताही केन्द्रीभूत उपाय चाल-णार नाही. इतर कशाहीपेक्षा आणीबाणीने हे अधिक चांगल्या प्रकारे दाखवून दिले आहे. ह्या देशात लोकशाही व्यवस्था बराच काळ नांदली, तिला अनुसरून सामाजिक आणि राजकीय व्यवहार झाले आणि ह्या साऱ्याचा परिणाम म्हणून अनेक-विध सामाजिक–आर्थिक आणि प्रादेशिक–स्थानिक हितसंबंध वर आले आहेत, दृढ झाले आहेत आणि त्यांची एक गुंतागुंतीची रचना येथे सजली आहे. तेव्हा लोकशाही व्यवस्थेचा अधिक विस्तार करून राजकीय आणि सामाजिक–आर्थिक सत्तेची मूलभूत पुनर्बांधणी करणे गेल्या बारा वर्षांच्या काळात अगत्याचे होऊन बसले होते. ह्या प्रक्रियेत खोटया प्रेषितांनी वारंवार व्यत्यय आणला आहे आणि तसाच आपल्या राजकीय व्यवस्थेत जो पेचप्रसंग निर्माण झाला आहे त्याच्या खऱ्या स्वरूपाचे आक-लन न झालेल्या, थतरवितर राजकारण्यांनीही आणला आहे.

येत्या निवडणुकीमुळे ह्या मूलभूत पुनर्बांधणीच्या प्रक्रियेला जर खरीखुरी चालना मिळायची असेल तर लोकशाहीच्या मार्गावर निष्ठा असलेल्या पक्षांनी लोकशाही व्यवस्थेची पुनःस्थापना करण्याचे आणि ही व्यवस्था अधिक विस्तृत आणि खोल करण्याचे उद्दिष्ट स्वीकारून त्या दृष्टीने हालचाल केली पाहिजे. जनता, लोकदल, काँग्रेस (अ) आणि डावे पक्ष खोटया, कृतकसमस्यांना बाजूला सारतील आणि ह्या मूलभूत कामगिरीकडे वळतील अशी अपेक्षा अवा-स्तव ठरेल का? आपला प्रमुख शत्रू कोण आहे ह्या-विषयी त्यांचे एकमत होईल, आणि त्यांच्यात पर-स्परात जे मोठाले भेद आहेत त्यांचे निवारण करून आणि वर दिग्दर्शित केलेल्या दिशेने राजकीय व्यव-स्थेची पुनर्रचना करायला आपण सर्व बांधलेले, सह








असे जाहीर करून ते ह्या शत्रूशी मुकाबला करतील अशी अपेक्षा करणे गैर ठरेल का ? ही निवडणूक अवेळी आली आहे खरी. पण सामाजिक आणि राजकीय शक्तींची एक नवीन बांधणी घडवून आणण्यासाठी तिचा उपयोग करून घेता येईल की नाही ? जर प्रमुख लोकशाहीवादी पक्ष एकमेकांचा नाश करायलाच निघाले असतील आणि अशा रीतीने सर्व आत्मनाश करून घेणार असतील तर ह्या प्रश्नाचे उत्तर अर्थात् 'नाही' असेच द्यावे लागेल. पण समजा त्यांनी आपल्या दुय्यम मतभेदांची व्याप्ती मर्यादित आहे हे ओळखून, निवडणुकीचा राजकीय खेळ खेळताना काही नियम पाळण्याचे बंधन पत्करले, निवडणुकीचे संघटन आणि प्रचाराची मोहीम यांच्या संदर्भात एक आचारसंहिता स्वीकारली, निवडणुकीचा जो काही निकाल लागेल त्याचा एक नवीन राजकीय व्यवस्था निर्माण करू पहाणाऱ्या पुनर्बांधणीच्या दिशेने टाकलेले ते एक पाऊल आहे असे समजून, मनःपूर्वक स्वीकार करायचे जर त्यांनी ठरविले तर ह्या प्रश्नाचे उत्तर 'होय' असे देता येईल असे मला वाटते.

आपण एक गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. कॉंग्रेसची व्यवस्था ढासळल्यानंतर आपल्याला आवश्यक आहे अशा स्वरूपाची टिकाऊ राजकीय व्यवस्था आपल्यापाशी नाही. "आपल्याला आवश्यक आहे अशा स्वरूपाची" म्हणजे (१) भिन्न सामाजिक हितसंबंधांना आणि राज्यव्यवस्थेच्या भिन्न स्तरांना एका समान चौकटीत सुसंगतपणे सामावून घेईल अशी, आणि (२) जनतेच्या गरजांचे आणि आकांक्षांचे खरेखुरे समाधान करीत राहील अशा रीतीने परिणामकारक कृती उभारू शकेल अशी. आपण हेही ओळखले पाहिजे की इंदिरा गांधी ज्या एककेंद्रित आणि बहुधा अधिकारशाहीवादी राजवटीची तरफदारी करून ती लोकांपुढे मांडीत आहेत ती नेमक्या ह्या दोन्ही गोष्टी साधील असे आश्वासन त्या देत आहेत. लोकांच्या आकांक्षांचे समाधान करण्यात त्या मागे अपेशी ठरल्या होत्या ही आठवण आता विरत चालली आहे. भविष्यातसुद्धा, जनतेच्या गरजा-आकांक्षांचे समाधान करू शकेल अशी व्यवस्था त्या निर्माण करू शकतील असे काही प्रमाण त्यांनी दिलेले नाही असेही म्हटले जाईल. पण हा वादग्रस्त मुद्दा ठरेल. ते काही असो, भूतकाळापासून जर आपल्याला काही शिकण्यासारखे असेल तर ते आहे : लोकशाहीच्या प्रक्रियांची पुरतेपणे पुनःस्थापना केल्याशिवाय आणि आर्थिक व राजकीय सत्तेचे भरघोसपणे विकेंद्रीकरण करून त्यांना सखोल केल्याशिवाय भरीव आणि परिणामकारक कृती करता येणे शक्य नाही. श्रीमती गांधींचा पक्ष हे करू शकणार नाही. इतर पक्ष हे करू शकतील, पण एका अटीवर. स्वतःपुढे उभे असलेल्या आव्हानाचे स्वरूप त्यांनी ओळखले पाहिजे आणि निवडणुकीसाठी ते जी रणनीती (स्ट्रॅटेजी) आखतील ती ह्या आकलनावर त्यांनी आधारली पाहिजे. ह्याच्यात ते चुकले तर इतिहास त्यांना क्षमा करणार नाही.

**संदर्भ टीपा—**

१. ह्या तऱ्हेचा हस्तक्षेप होण्याचा संभव आहे असा इशारा, प्रस्तुत लेखकाने, श्री. जॉर्ज व्हर्गीज ह्यांनी गांधी पीस फाउण्डेशन मध्ये १९ जुलै १९७९ रोजी संघटित केलेल्या सार्वजनिक सभेत दिला होता. दुसऱ्या दिवशी हा इशारा दिल्याची बातमी वर्तमानपत्रात प्रसिद्ध झाली होती आणि त्याच्या बरोबर पुढल्या दिवशी राष्ट्रपतिभवनाच्या प्रवक्त्याने राष्ट्रपतींचा असा कोणताही इरादा नसल्याचे जाहीर केले होते.

२. **अगदी** काटेकोरपणे बोलायचे तर असे म्हणता येईल : श्रीमती गांधी ह्यांनी श्री. चरणसिंग यांना आपण लोकसभेमध्ये पाठिंबा देऊ असे अगोदर जाहीर केले होते—पुढे ते त्यांनी मागे घेतले आणि ह्या तऱ्हेची आश्वासने अविश्वसनीय असतात आणि विश्वासघातकी ठरू शकतात हे त्यांनी दाखवून दिले. पण जनतापक्षाला पाठिंबा देण्याच्या बाबतीत एवढेही जाहीर आश्वासन कोणत्याही पक्षाने किंवा पक्षांनी न दिल्यामुळे श्री. जगजीवनराम यांचा आपण लोकसभेत आपले बहुमत सिद्ध करू शकू आणि ह्याचे प्रमाण एकदोन दिवसात देऊ शकू हा दावा मान्य न करण्याचा राष्ट्राध्यक्षांना हक्क होता. राजकीय दृष्टिकोनातून पहाता हा युक्तिवाद मला पटण्यासारखा वाटत नाही. राज्यघटना-

विषयक कायद्यात त्याला काही स्थान आहे की नाही ह्या मुद्याविषयी येत्या काही महिन्यांत, आणि वर्षांतसुद्धा, खडाजंगीचा वादविवाद होत राहील असे दिसते. राष्ट्राध्यक्षांच्या कृतीवर माझी जी टीका आहे ती घटनात्मक कारणांवर इतकीशी आधारलेली नाही. जनतापक्षात फूट पडल्याने जी परिस्थिती निर्माण झाली होती तिची सोडवणूक करणारा मार्ग शोधण्याचा अवसर राजकीय प्रक्रियांना देण्यात आला नाही ह्या वस्तुस्थितीवर ती आधारलेली आहे.

३. गेल्या अनेक वर्षांतील 'सेमिनार'च्या अंकांतून आणि माझ्या "डेमॉक्रॅटिक पॉलिटी अँड सोशल चेंज इन् इंडिया: क्रायसिस अँड ऑपर्च्युनिटी" (भारतातील लोकशाही राज्य व्यवस्था आणि सामाजिक परिवर्तन : पेचप्रसंग आणि संधी), नवी दिल्ली, अलाइड पब्लिशर्स, १९७६, ह्या पुस्तकात मी हे केले आहे. तसेच पहा: "इन्टिग्रेशन अँड परफॉर्मन्स, टू पिव्होट्स ऑफ् इंडियाज् मॉडेल ऑफ् नेशनबिल्डिंग." हा निबंध मी संपादन केलेल्या "स्टेट अँड नेशनबिल्डिंग : ए थर्ड वर्ल्ड पर्स्पेक्टिव्ह" (नवी दिल्ली : अॅलाइड पब्लिशर्स)

४. पहा: "व्होटिंग इन् इंडिया" हे पाच लेख 'सेंटर फॉर धि स्टडी ऑफ् डेव्हलपिंग सोसायटीज्' ह्या संस्थेतील संशोधकांनी हे लिहिले असून 'इकॉनॉमिक अँड पोलिटिकल वीक्ली'— वार्षिक अंक, ६ (३–५), जानेवारी १९७१ मध्ये प्रसिद्ध करण्यात आले आहेत.

५. अधिक तपशिलवार विश्लेषणासाठी पहा: डी. एल्. शेठ, 'पॉलिटिक्स ऑफ् कास्ट कॉन्फ्लिक्ट,' सेमिनार, वार्षिक अंक, २३३, जानेवारी १९७९.

६. १९६९ ते १९७३–७४ ह्या कालखंडात कारभारात जी काही गतिशीलता आणि कौशल्य आढळून येत होते त्याचे जवळजवळ सर्व श्रेय त्या काळातील इंदिरा गांधींच्या सल्लागार–मंडळाला आणि पंतप्रधानांच्या सचिवालयात विचारपूर्वक होत असलेल्या तपशिलवार नियोजनाला दिले पाहिजे. अ. भा. काँ. कमिटीच्या १९६९ च्या बंगलोर अधिवेशनापासून तो बांगला देशच्या युद्धापर्यंत जी अनेक प्रभावी कृत्ये निधडेपणे करण्यात आली त्या सर्वांच्या बाबतीत ही गोष्ट सत्य आहे. श्रीमती गांधी ह्या एक हुषार आणि चाणाक्ष राजकीय नेत्या आहेत, धोका पत्करण्याची त्यांची तयारी असते आणि परिस्थितीने कधीही आव्हान दिले तर त्याचा समाचार घेण्याची कुवत त्यांच्यात आहे असे अनेकजण मानतात. वस्तुस्थिती अशी आहे की राजकारणी म्हणून त्या सुमार कर्तृत्वाच्या आहेत आणि राजकीय रणनीतीची (स्ट्रटेजी) किंवा दोस्तपक्षांची निवड करताना, किंवा (त्यांचा ज्याच्याविषयी विशेष बोलबाला आहे त्या) कृतीसाठी अचूक वेळ साधताना त्या अनेकदा लटपटल्या आहेत. त्यांचे अगोदरचे जे सल्लागारमंडळ होते त्यातील व्यक्तींना हळूहळू बाहेरची वाट दाखविल्यानंतर— आणि कालांतराने काँग्रेस पक्षातील ज्या मंडळींनी त्यांना पाठिंबा दिला होता आणि त्यांची एक बलशाली प्रतिमा निर्माण केली होती त्यांनाही सोडून जावे लागले— ही सगळी कौशल्येही लुप्त झाली, आणि सरकारात आणि पक्षात त्यांना असलेला पाठिंबा हळूहळू रोडावत गेला. ह्याचा परिणाम असा झाला की त्यांच्या समवेत असलेल्या कर्तबगार मंडळीला हळूहळू गळती लागली आणि ही प्रक्रिया १९७७ च्या निवडणुकीनंतर चालूच राहिली आहे. त्यांच्याबरोबर असलेल्या कित्येक समर्थ व्यक्ती— उत्तरेतील तसेच दक्षिणेतील— ह्या निवडणुकीनंतर त्यांना सोडून गेल्या आहेत. आता त्यांच्याबरोबर उरले आहेत ते एकतर तोंडपुजे आहेत, ज्यांना स्वतःची काही राजकीय पाळेमुळे नाहीत असे तोंडपुजे किंवा राजकारणाचा धंदा करणारे लोक आहेत— आणि असे इतर धंदेवाईक राजकारणी गोळा करण्याची काय ती कुवत त्यांच्या ठिकाणी असते. आज इंदिरा गांधींच्या दरबारात जे लोक परतत आहेत त्यांच्यातील बहुतेक, ज्यांना लोकांत स्वतःची अशी राजकीय बैठक नाही, आणि त्यांच्या जुलूशात सामील झाल्याशिवाय आपण निवडून येणार नाही हे ज्यांना स्वतःलाच ठाऊक आहे, असे नाचक्की झालेले राजकारणी आहेत.

डॉ. श्री. गो. पळसुले

# भारतात रूढ झालेल्या वैद्यकीय पद्धती

भारतात मूलतः आयुर्वेदिक औषध पद्धती पुरातन कालापासून चालत आली आहे. परंतु ब्रिटिश काळात ॲलोपाथी म्हणजेच व्याधिविपरीत औषधपद्धतीचा उगम झाला व तिचा प्रचार झपाट्याने होऊन त्या औषधपद्धतीची दुकाने आणि वैद्यकीय महाविद्यालये यांची झपाट्याने वाढ होत गेली. इतकेच नव्हे तर त्या वैद्यकाला राजमान्यताही प्राप्त झाली. आयुर्वेदाचे जुन्या काळातील लोक तत्त्वनिष्ठ व अभ्यासू होते. त्यामुळे सुश्रुत वाग्भटांच्या परंपरेची थोडी फार तरी चमक त्यांच्याजवळ आढळत असे. महाराष्ट्रात लो. टिळकांच्या काळानंतर आयुर्वेदिक अभ्यासूंचा तटही कोसळत गेला व त्याचा खराखुरा मागमूसही हुडकण्याची आज पाळी आलेली आहे. कालमानाप्रमाणे दर्जा वाढण्याच्या ऐवजी आयुर्वेदाचा दर्जा कमीच झाला, ही दुःखाची गोष्ट होय. आयुर्वेदातील मूलभूत विचार चांगले आहेत. या पद्धतीची औषधेही गुणकारी असतात; परंतु त्यांची उपलब्धता कठीण झालेली आहे आणि दर्जेदार औषधांचा गटही त्या औषधांत कठीण झालेला आहे. तसेच दर्जेदार औषधांचा गटही त्या औषधांत कमीच आढळतो. एखाद्या औषधात वेगवेगळी १५–१६ औषधे असूनही त्यात जर कमी औषधे घातली गेली, तर त्या औषधाचा अपेक्षित गुण कसा येणार? या औषधपद्धतीच्या शिक्षणक्रमात संस्कृतसारख्या कालबाह्य भाषेचा संबंध येत असल्याने आधुनिक म्हणजे अलिकडच्या काळातील विद्यार्थ्याला विषय समजून घेण्यात अनंत अडचणी येत असतात. आणि त्याच्यात न्यूनगंडही त्यामुळे वसत असतो. तापासारख्या शीघ्रविकोपी रोगावर आयुर्वेदात औषधेच नाहीत असे माझ्या माहितीतील काही आयुर्वेदिक डॉक्टरांनी मला वेळोवेळी सांगितल्याचे स्मरते. आयुर्वेदिक औषधनिर्मितीमध्ये औषधांचे ओज वाढवतात व त्यासच शतपुटी व दशपुटी वगैरे संबोधले जाते. मी स्वतः आयुर्वेदिक औषधे वापरत नसल्याने या विषयावर माझे प्रभुत्व नाही. तथापि सर्वसाधारण वाचन व अवलोकनाच्या आधारे मी हे विचार व्यक्त करीत आहे. शिवाय माझे वडील कै. डॉ. गोपाळराव पळसुले यांचे मित्र पुण्यातील श्रेष्ठ आयुर्वेदाचार्य वैद्य नानल व पंचानन कृष्ण शास्त्री कवडे यांच्या आजारात त्यांना उपचार करीत असत आणि वऱ्हाडमधील डॉ. बाबासाहेब परांजपे आमचे घरी अनेक वेळा आयुर्वेदावर चर्चा करीत असत. त्यामुळे मला ऐकीव माहितीही प्राप्त झालेली आहे. श्री. कवडे व नानल शास्त्री तर वडलांच्या नेहमीच्या बैठकीतलेच होते. अर्थात लहान वयात मला जास्त आकलन होणे शक्यच नव्हते.

ॲलोपाथी ही व्याधीविपरीत चिकित्सा म्हणून सुरवातीस उल्लेख केलेला आहे. त्याचा आशय असा की रोगनिदान अचूक करूनही उपचार जर विपरीत केले गेले, तर गुण येण्याचे तर दूरच राहो परंतु प्रकृतीच्या नैसर्गिक अवस्थेवरही ॲलोपाथिक औषधांचे विपरीत परिणाम होतात. असे विपरीत परिणाम होण्याचे प्रमुख कारण माझ्या दृष्टीने असे आहे की, औषधे तयार करणाऱ्या व्यक्ती अगर कारखानदार व्यक्तिशः 'प्रॅक्टीशनर' नसतात. किंवा उलट बोलावयाचे झाल्यास जे डॉक्टर ॲलोपाथिक वैद्यकाने तयार होतात त्यांना औषधीनिर्मितीची माहिती नसते. औषध निर्माते फक्त औषधांचा गुण बघतात; परंतु त्याने होणाऱ्या अपायाकडे ते दुर्लक्ष करतात. ते फक्त प्रयोगशाळेतील नळीकडे बघतात; परंतु सजीव मनुष्यमात्रावर त्याचे काय परिणाम होतात, याची ते पर्वाही करीत

अनुक्रमणिका








नाहीत. याच कारणांमुळे होमिओपाथी म्हणजे समचिकित्सेचा जन्म झाला. डॉ. हानिमानांनी जेव्हा ॲलोपाथीची औषधे हिवतापावर घेतली तेव्हा त्यांची काही लक्षणे वरी झाली; परंतु उपद्रवी लक्षणेही उद्भवली तेव्हा ते संशोधक बनले. असे संशोधन करताना त्यांच्यासारख्या असामान्य बुद्धिमत्तेच्या चिकित्सक मनात अनेक विचारांनी जोर केला व रोग संपूर्ण बरा होण्यामागे काहीतरी निश्चित तत्त्व दडलेले असलेच पाहिजे याची त्यांना जाणीव झाली व त्यातूनच "समः समं समयती" म्हणजे समलक्षणी औषधच रोगांचा संपूर्ण पाडाव करणारे असते, असे त्यांना आढळून आले व तोच पुढे सिद्धांत म्हणून घोषित झाला. रोगनिर्माण करणारी शक्ती म्हणजेच रोग वरी करणारी शक्ती हे दडलेले, सुप्त मर्म त्यांनी जगापुढे उघडून ठेवले. त्याच वेळी सूक्ष्म मात्रा, औषधांचा ओज वाढवून वेगवेगळ्या शक्तींतून त्यांची निर्मिती करणे, एकाच औषधाने जास्तीत जास्त रोगलक्षणे दूर करणे वगैरे नियमांचा उगम झाला. इतकेच नव्हे तर औषधांचा हा संबंध फक्त रोगाशी नसून जिवंत रोग्याशी म्हणजेच त्याच्या जीवनशक्तीशी असतो, हे त्यांनी सप्रयोग दाखवून दिले. असे करताना नैसर्गिक नीतिनियमांचा त्यांनी जोरदार पुरस्कार केला. यामुळे होमिओपाथीची औषधे अपायकारक नसतात. कारण त्यांच्यातला अपायकारक गुण सूक्ष्म मात्रा, ओज वाढविणे, वगैरेंमुळे दूर झालेला असतो. आता ॲलोपाथी व होमिओपाथीत नेमका फरक कोणता हे समजण्यासाठी त्यांच्यात जुळणाऱ्या गोष्टी कोणत्या हे बघू या. पहिली साम्यता म्हणजे दोन्ही पद्धती पाश्चात्य (युरोपियन) आहेत. त्यामुळे मूलभूत वैद्यकीय शिक्षणक्रमातही बदल नाही. होमिओपाथीचे जनक डॉ. हानिमान स्वतः ॲलोपाथीचे एम्. डी. होते. म्हणजे होमिओपाथीचा जनक हा ॲलोपाथच होता, हे ध्यानात घ्यावे लागेल; परंतु डॉ. हानिमान तर्कनिष्ठ (रॅडिकल) असल्यामुळे त्यांनी ॲलोपाथीतले दोष (किंवा उणीवा) पाहून प्रथम मनुष्यमात्र व औषध यांचे संबंध एकमेकांना पूरक कसे होतील याचे संशोधन केले व त्यामुळे होमिओपाथीच्या निघंटूत मानसिक लक्षणांचा समावेश आढळतो. औषधांचे प्रयोग करताना 'थँक यू' असे म्हणल्यावर एक बाई रडली, अशा लक्षणांचे टिपणही डॉ. हानीमानाच्या औषधी गुणधर्म पुस्तकात आढळते. पल्सेटिलाचा स्त्रीरोगी रडल्याशिवाय लक्षणेच सांगू शकत नाही किंवा इग्नेशियाचा रोगी सारखे उसासे सोडतो आणि चामोमिलाचे मूल आईला सारखे कडेवर घ्यावयास लावते किंवा रागीटपणे वागते वगैरे सूक्ष्म परंतु अत्यंत महत्त्वाच्या लक्षणांकडे डॉ. हानिमानांनी लक्ष पुरवले म्हणूनच होमिओपाथीचा औषधी संग्रह सिद्ध व अत्यंत उपयुक्त ठरला. 'सब घोडे बारा टक्के' म्हणजे अनेक रोग्यांना एकच औषध ॲलोपाथीत देतात तसे न करता प्रत्येकाची लक्षणे वेगवेगळी असतात हे ध्यानात घेऊन होमिओपाथीची औषधे दिली जातात. यावरून एक लक्षात येईल की, होमिओपाथीत रोगापेक्षाही 'रोग्याची' काळजी अधिक घेतली जाते. ॲलोपाथी व होमिओपाथी यांच्यामध्ये रोगनिदान पद्धतीतही फरक नाही. उदाहरणार्थ, हृदयशूळ आढळल्यास (अंजायना पेक्टोरीस) दोन्हीही पद्धतीत रोगनिदानाची पद्धत एकच असते; उपचारपद्धतीत मात्र ॲलोपाथीतला एक प्रकारचा 'नाठाळपणा' होमिओपाथीत नाही. एखाद्या हृदय किंवा पोटाच्या तक्रारी असणाऱ्या रोग्याने भीती वाटण्याची तक्रार केल्यास ॲलोपाथीचे डॉक्टर म्हणतील 'काही नाही हो, तुमचा हा विकार मानसिक आहे,' म्हणून तिकडे आपुलकीने बघणार नाहीत. उलटपक्षी होमिओपाथीचा डॉक्टर ॲकोनाईट सारखे औषध देऊन रोग बरा करील. कारण त्याला ॲकोनाईट या औषधाचे गुणधर्म चांगले माहिती असतात. ॲकोनाईट हे औषध हृदयशूळावरही उपयुक्त आहे आणि भीती वाटणे हे त्याचे एक प्रमुख लक्षण आहे. वस्तुतः या प्रकारची भीती वाटणे हा मानसिक रोग नसतो; परंतु मूळच्या शारीरिक त्रासाची परिणती मनावर परिणाम करणारी होत असते व त्यामुळे रोग्याला भीती वाटत असते. तेव्हा 'सायको न्युरॉसिसच्या' केसेस वेगळ्या व अन्य कारणाने परिणाम म्हणून निर्माण झालेली भीतीसारखी लक्षणे वेगळी. याचा आशय होमिओपाथिक वैद्यक पद्धतीतच घेतला जातो. वस्तुतः रोग्याची सर्वंकष चौकशी करण्याचे शिक्षण

अनुक्रमणिका

दोन्ही शाखांतच आहे; परंतु अॅलोपाथीचे शिक्षण संपल्यावर त्या पद्धतीचे डॉक्टर प्रॅक्टिसमध्ये त्याचा अवलंब हिरीरीने करीत नाहीत; परंतु होमिओपाथीचे डॉक्टर मात्र प्रॅक्टिसच्या सुरवातीपासून शेवटपर्यंत चौकस बुद्धीचे राहतील. कारण तसे शिक्षण होमिओपाथीत अंतर्भूत झालेले आहे.

होमिओपाथीत रोग-निदान (डायग्नॉसीस), विकृतिज्ञान (पॅथॉलॉजी), रोगविज्ञान (मेडिसिन), शस्त्रक्रिया (सर्जरी) वगैरे सर्व विषयांचा सांगोपांग अभ्यास अॅलोपाथीप्रमाणेच अंतर्भूत असतो; परंतु या सर्व विषयांच्या आधारे होमिओपाथीची उपचार-पद्धती भक्कम झालेली आहे. होमिओपाथीतला औषध उपचार (थेरॅप्युटिक्स) म्हणजे एक सोनेरी टोपच म्हणावा लागेल. होमिओपाथिक उपचार पद्धती अत्यंत व्यावहारिक असून त्यात केवळ शब्दच्छल कधीही केला जात नाही. रोग्याच्या सर्व लक्षणसमूहांचा विचार करून वैशिष्टचदर्शक व ठळक लक्षणांवरून औषधाची निवड केली जाते व अचूक औषध निवडीवर आश्चर्यकारक गुण येतात. होमिओपाथी वेगवेगळचा विशेष वैद्यकीय विषयांना अभ्यासात स्थान देते म्हणजेच कान, नाक, घशाचे विकार, मनोविकार, त्वचारोग, वगैरे. परंतु उपचारासाठी या सर्वांची वेगळी दालने उघडून केवळ एकाद्या भागाचे उपचार म्हणजेच आजकालचे स्पेशॉलायझेशन करीत नाही. कारण होमिओपाथीत या सर्व विकारांवर औषधे असतात. विशिष्ट रोगांचे वर्गीकरण करण्यासही होमिओपाथीचा विरोध नाही. आजकाल हृद्-रोग वाढल्यामुळे त्यांचे विभाग (वॉर्डस्) तयार केलेले असतात. इंटेन्सिव्ह कॉर्डियॅक युनिट असे त्यास म्हणतात; परंतु अशा ठिकाणीही होमिओपाथीत उपचाराच्या तंत्रात वेगळेपणा आणण्याचे कारण पडत नाही. कारण होमिओपाथीची सिद्ध झालेली औषधे हेच तिचे खरे वैभव होय. जुनाट रोगांचो डॉ. हानिमानकृत गटवारी तर होमिओपाथीचे आणखीन एक खास वैशिष्टच म्हणावे लागेल. आयुर्वेदातील वात, पित्त, कफ पद्धतीप्रमाणे होमिओपाथीतही त्रिदोषात्मक पद्धतीची मांडणी केलेली आहे. कुष्टरोग. प्रमेह व उपदंश या प्रकृतीचे रोगी असतात. त्यांची विशिष्ट लक्षणेही असतात. खाज उठण्याची प्रवृत्ती हे कुष्ठरोगाचे द्योतक होय. प्रमेह रोगाच्या प्रकृतीत चामखीळ किंवा तत्सम वाढ शरीरावर आढळते व उपदंश प्रकृतीत चट्टे आढळतात. उत्साही, उद्योगी, चपळ व हुषार या प्रकृतीचे रोगी कुष्ठप्रकृतीत सामावतात. खिन्न, दुर्मुखलेले, उपदंशप्रकृतीत असतात. तिरसट, तुसडे व त्रासिक हे प्रमेहप्रकृतीचे निदर्शक असतात. एक, दोन अगर तिन्ही दोषांचे एकत्रित प्रकृतीचे रोगीही असतात व त्यानुसार प्राकृतिक औषधे देण्याने फायदा होतो. जुनाट रोग बरा करताना औषध निवडीस जुनाट रोगांच्या मीमांसेचा असा फायदा होतो.

होमिओपाथीच्या या नावीन्यपूर्ण तत्त्वज्ञान-पद्धतीमुळे वैद्यकातील विकृतिविज्ञानशास्त्र व जंतुशास्त्र यांच्या ज्ञानाहूनही अधिक मदत रोग निवारणाच्या दृष्टीने डॉ. हानिमानांच्या या विचार-पद्धतीत साठवलेली आहे. इतर विषयाप्रमाणे रोगांवर शुष्क चर्चा न करता रोग बरा करणाऱ्या औषध निवडीस मार्गदर्शक विचारच होमिओपाथीत आढळतात, हेच तिचे वैशिष्टच होय.

अनुक्रमणिका

## ग्रंथ-परीक्षण

**'साठवणी'**–रा. भि. जोशी; मौज प्रकाशनगृह; मुंबई १९७९; पृ. २१२; किंमत ३० रुपये.

'साठवणी' हे प्राचार्य रा. भि. जोशी यांचे नवे पुस्तक. यात त्यांच्या जीवनातील संस्मरणीय प्रसंग-विशेषांच्या आठवणी ग्रथित केल्या आहेत. साठवलेल्या आठवणी म्हणून साठवणी. अतिशय देखणे आणि सुबक शीर्षक. प्रा. जोशी यांच्या मनोज्ञ शैलीसारखेच. त्यांच्या लेखनाशी परिचित असणाऱ्या वाचकांना त्यांची कल्पनाबहुल आणि काहीशी चित्रमयी भाषा स्मरत असेल.

रा. भि. जोशी हे नाव मूलतः प्रवासवर्णनपर ललित लेखनाकरिता ज्ञात आहे. त्यांनी भारतात अनेक ठिकाणी कारणपरत्वे आणि अकारणही विपुल प्रवास केला आहे. या प्रवासातील बरे वाईट टप्पे जाणीवपूर्वक टिपले आहेत आणि स्वतःसमवेत वाचकांकरिता एका अनोख्या आनंदयात्रेची कथा सांगितली आहे. तसे जोशी प्रकृतीने गोष्टीवेल्हाळ नव्हेत; किंबहुना कुठे उधळून द्यावे, झोकून द्यावे हा त्यांचा स्वभाव नाही. त्यांच्या व्यक्तिगत जीवनात ज्या आखीवरेखीव चाकोऱ्या त्यांनी पाडून घेतल्या आहेत, त्याच चाकोऱ्यांनी त्यांच्या अनुभव घेण्याच्या क्षमतेला एक अपरिहार्य चौकट बहाल केली आहे. त्यांची ही चौकट बेतशीर असली तरीही ती मोहक आहे, आपल्यासमवेत वाचकालाही ती चौकटीतील अनुभवांचा रम्य, धोका न पत्करणारा आनंद देते.

गेल्या वीसएक वर्षांत मराठीत आत्मचरित्रवजा लेखनाची पंधराएक चांगली पुस्तके लिहिली गेली आहेत. सामान्यतः आत्मचरित्रपर लेखन जसे आणि जितपत सत्यानुसारी असते, तशी आणि तितपतच ही पुस्तके सत्यापासून बहुतांश फटकून राहणारी आहेत. कर्तबगार व नामवंत व्यक्तींना, उद्योगपतींना, कलावंतांना, कोणत्या ना कोणत्या कारणाने स्वतःचे चरित्र सांगावे असा मोह होतो. त्यांच्या जीवनाच्या उज्वल प्रकाशात आपल्यालाही मार्गक्रमणा करता येईल, अशी भाबडी आशा जनसामान्यांना असते. भाबडया आशा फसव्या असणार हे उघडच आहे. मुद्रित शब्दांवर श्रद्धा ठेवणाऱ्या वाचकांना सकृद्दर्शनी ही पुस्तके खरीच वाटली तर नवल नाही. यथावकाश त्यांना वस्तुस्थितीचे सम्यक ज्ञान आले की त्यांचा भ्रमनिरास होतो. पण पुन्हा नवे आत्मचरित्र समोर आले की नव्या दिशेचा साक्षात्कार अनुभवण्याकरिता हे भाबडे वाचक उत्सुक होतात.

प्रा. ना. सी. फडकेलिखित 'माझे जीवन एक कादंबरी', श्रीमती स्नेहप्रभा प्रधानलिखित 'स्नेहांकिता', श्रीमती आनंदीबाई विजापुरेलिखित 'अजून चालतेचि वाट' आणि श्री. आनंद साधलेलिखित 'मातीची चूल' ही सव्यापलाप करणाऱ्या किंवा सत्याभास निर्माण करणाऱ्या आत्मचरित्रांची ठळक उदाहरणे आहेत. निरनिराळ्या कारणांनी ही पुस्तके गाजलेली आहेत किंवा हेतुतः गाजविण्यात आलेली आहेत. संबंधितांना या पुस्तकांतील मजकूर कारणपरत्वे आणि प्रसंगपरत्वे रंजक तरी विनोदी असल्याची प्रचीती आलेली ऐकिवात आहे.

प्रस्तुत 'साठवणी' या ग्रंथास वरील यादीत समाविष्ट करणे शक्यच नाही, हे उघड आहे. कारण प्राचार्य जोशी हे सर्वार्थाने सच्छील व सद्गृहस्थ आहेत. त्यांचे एकूण जीवन उघडया पुस्तकासारखे आहे. लपविण्यासारखे त्यांच्या जीवनात काहीच नाही. तरीही ते आपल्याला विश्वासात घेऊन खुल्या दिलाने सगळे काही सांगतात असे वाटत नाही. एकतर त्यांच्या वागण्यातच एक प्रकारचा, विद्वत्तेला शोभेल असा संकोच आहे. स्वतःविषयी ते फार कमी बोलतात. म्हणून तर या जुन्या आठवणींचे पुनःस्मरण करताना त्यांनी बऱ्याच ठिकाणी हात आखडता घेतलेला आहे, असे सारखे वाटत राहते.

आपल्या सोयीचे प्रसंग ते निवडतात आणि त्यांचे निवेदन बहुतांश वेळी विनाकारण एकसुरी होते. अलिप्ततेच्या अति आहारी जाण्याची टूम, कधीकधी

अनुक्रमणिका

कलात्मकतेलाच खो देऊन जाते. श्री. ना. पेंडसे यांच्या तथाकथित आत्मचरित्रात (तथाकथित अशाकरिता की आधी 'एक मित्र' असे लेखकाचे नाव जाहीर करून मागाहून हळूच त्यांनी बुरखा बाजूस सारलेला आहे) या प्रकारच्या अलिप्ततेचा कळस झालेला आढळतो. आत्मगौरव, आत्मसमर्थन यांनी ओतप्रोत भरलेल्या या पुस्तकात श्री. पेंडसे यांनी खूपच मौजांचे अपूप दर्शन घडविलेले आहे. त्यांना ओळखणाऱ्या सर्व जिज्ञासूंनी ते मुळातूनच वाचले पाहिजे. असो.

प्राचार्य जोशी यांच्या जीवनाचा महत्त्वाचा कालखंड उर्दूभाषिक निजामीत आणि मराठीचे वैदर्भी रूप दर्शविणाऱ्या वऱ्हाडात गेलेला आहे. अतिशय खडतर बालपण वाट्याला आलेल्या या गृहस्थांची जीवनाशा तरीही सतेज राहिली आहे. त्यांच्या स्वभावात बिलकूल कडवटपणा आलेला नाही, हे आनंददायक भासले तरी विस्मयकारकही आहे. वयाच्या अवघ्या चवदाव्या वर्षी लाभलेले पोरकेपण, शिक्षणाची परवड, मामांसारख्या आप्तांचा राग, एकुलत्या बहिणीच्या विषयात दैवाने केलेली विचित्र फसगंमत, या सगळ्यांतून त्यांनी आपले स्वतंत्र अस्तित्व जिद्दीने टिकवून धरलेले आहे.

पुढच्या आयुष्यात त्यांनी जे अनेकानेक प्रवास केले, त्याची आश्चर्यकारक सुरवात फार लहानपणीच त्यांच्या अनुभवास आली आहे. निरनिराळ्या भाषांविषयी त्यांना वाटणारी कुतूहलमिश्रित आपुलकी काय किंवा वेगवेगळ्या थरांतील माणसांत त्यांना घडलेले माणुसकीचे दर्शन काय, हा त्यांच्याकडील फार मोठ्या धनाचा भाग आहे. अतीव प्रीतीने त्यांनी हे धन जपल्याचे जागोजाग जाणवते.

उर्दू, तेलुगू, कन्नड आणि मराठीच्या विविध बोली यांचे जे कमीअधिक ज्ञान प्रा. जोशी यांना आहे, तो त्यांचा एक अभिमानविषय, निदान कौतुकविषय असावा. मराठीशिवाय अन्य भाषांतील त्यांनी केलेले निर्देश बऱ्याच वेळा निरर्थक किंवा निरुद्देश वाटतात. त्यांच्या ऐकण्यातील एखादा उर्दू-कन्नड शब्द किंवा शब्दसंहती त्यांना जशी लोभावून टाकते. कितीएक शब्द ते असे वापरून जातात की निखळ मराठी वाचकाला त्यांचा शब्द केवळ अंदाजाने, अनमानधपक्याने जाणून घ्यावा लागतो. आरायष बल्दा, तख्ती, आमदन, करोमा, चहलबसक, असे अनेक उर्दू शब्द आणि तसेच पुष्कळसे कन्नड शब्द ते वापरतात. प्रादेशिक कथा-कादंबरीवर घेण्यात आलेले शब्दवापरविषयक आक्षेप या ठिकाणी स्मरतात.

प्रा. जोशी यांचे महाविद्यालयीन जीवन ही अडचणींची, विफलतेची, पराभवावर मात करण्याची आणि देदीप्यमान यशाची सरमिसळ गाथा आहे. असे जीवन कुणाही कमकुवत मनाच्या माणसाच्या वाट्यास येते तर तो खचित मोडून पडता. थोड्याफार फरकाने हेच त्यांच्या रुग्णतेविषयीही म्हणता येईल. अवघड झालेल्या दुखण्याने जर्जर झालेले जोशी जीवनाचा जो शांकरभाष्य धर्तीचा विचार करतात, तो वेधक वाटतो.

असाच वेधक व मनोज्ञ विचार, या ग्रंथातील अंतिम प्रकरणात प्रकट झालेला आहे. 'थोडेसे आत डोकावून' या अन्वर्थक शीर्षकाच्या प्रकरणात प्राचार्य जोशी यांनी त्यांच्या जीवननिष्ठांचा किंचित अंतर्मुख होऊन मागोवा घेण्याचा प्रयत्न केला आहे. आपल्याला जेथे जायचे होते तेथपर्यन्त आपण पोचलो का, आपल्या सुखाच्या ज्या कल्पना होत्या त्या कितीशा साध्य झाल्या, जीवनातील अनेकानेक वळणा-वाकणांवर ओठाशी आलेला सुखाचा प्याला अर्धा भरलेला आहे म्हणून सुख मानावे की तो अर्धा रिकामाही आहे म्हणून खंत करावी, असे प्रश्नोपनिषद लेखकाने उभे केले आहे. स्वतःच या प्रश्नांची उत्तरे शोधण्याचा प्रयत्न केला आहे. आणि ही तत्त्वचिंतकाची भूमिका विनीत भावनेने लोभस करून ठेवलेली आहे.

प्राचार्य जोशी यांच्या सगळ्याच लेखनात ताजेपणाचा, निरामयतेचा आनंददायक प्रत्यय येतो, तसा तो 'साठवणी' नेही देण्यात कसूर केलेली नाही. तरीसुद्धा सुजाण वाचकाच्या मनातील काही प्रश्न अनुत्तरित राहतात. ते तसे का रहावेत हे कळत नाही.

स्वतःच्या एकुलत्या बहिणीच्या विषयात किंचित गहिवरून– कारण त्यांच्या कलात्मक अलिप्ततेला भावनावश होणे म्हणजे सवंग लोकप्रियतेच्या आहारी जाणे असे वाटत असावे– लिहिणारे जोशी,

अनुक्रमणिका

आपला विवाह, संसार, कन्यका, पत्नी यांविषयी जवळजवळ संपूर्ण मौन का धारण करतात ?

मनूला घर काही मिळाले नाही म्हणून खंतावणारे जोशी, स्वतःच्या 'घरा' विषयी किती चुटपुटता उल्लेख करतात ! दोनशेहून अधिक पृष्ठांच्या या पुस्तकात सौ. सुधाबाईंचा केवळ चारदा निर्देश आहे आणि तोही वाण्याने घरसामानाच्या यादीत केलेल्या निर्देशाएवढाच कोरडा व ओझरता आहे. त्यांच्या पत्नींचा प्रथम उल्लेख येतो तो पृष्ठ १८१ वर; त्या शिक्षिका म्हणून साठ रुपये पगार घेत होत्या. दिल्लीस त्यांनी भगिनी समाजात भाग घेतला, नाटकात काम केले, समाजाचे अध्यक्षपदही भूषविले. मनू अत्यवस्थ असल्याची तार येताच लागलीच रात्रीच्या गाडीने जोशी सपत्नीक नागपुरास पोहोचले आणि त्यांच्या पत्नी या मनूच्या जुन्या ओळखीच्या होत्या, त्यामुळे जोशींच्या लग्नाने मनूला आपले असे राहायला घर झाले. बस्स ! एवढेच.

'साठवणी'च्या प्रस्तावनेत प्रा. जोशी लिहितात : "ज्या व्यक्तींनी, अनुभवांनी, घटनांनी, स्थलांनी माझ्या मनावर ठसा उमटवला, संस्कार केले, माझे मन थोडेबहुत का होईना मला जाणवेलसे समृद्ध केले, माझ्या आषुष्याला दिशा दिली, किंवा एकदा मिळालेली दिशा बदलली, थोडक्यात म्हणजे माझे मन किंवा आयुष्य घडवले, त्यांच्या संबंधीच्याच ह्या आठवणी आहेत. "...

...आपल्या आठवणी लिहाव्या की नाही ह्यासंबंधी, तसेच त्यांच्या स्वरूपासंबंधीही, माझी पत्नी सौ. सुधा हिच्याशी स्वाभाविकपणेच अनेकवार चर्चा होत असे आणि सूचनांची देवघेवही होत असे."

वर प्रस्तावनेतील दोन छोटे परिच्छेद हेतुतः उद्धृत केले आहेत. या परिच्छेदांच्या प्रकाशात प्रा. जोशी यांनी जे निर्देश चटावर उरकावेत तसे गुंडाळले किंवा सर्वस्वी टाळले, त्यांचा विचार करणे आवश्यक आहे. कदाचित शक्यता अशीही आहे की सौ. सुधाबाईंनी सौजन्यजनक भिडस्तपणामुळे स्वतःविषयींचा मजकूर वगळण्याचा आग्रह धरला असेल किंवा त्यांना असा मजकूर खरोखरच निरर्थक वाटला असेल. सौ. सुधाबाईंचाच विचार करून बोलायचे झाल्यास उपरोक्त शक्यता गृहीत धरून मान्यही करण्यास प्रत्यवाय नसावा. तरीसुद्धा तपशिलात शिरून वाचन करणाऱ्या आणि लिखित मजकुरापेक्षा अधिक अर्थबहुल मजकूर दोन ओळींमधील कोऱ्या जागेत असू शकतो हे ठाऊक असणाऱ्या वाचकाला दुसऱ्या एका तपशीलाच्या बाबतीत केवळ अचंबा वाटतो !

'चादरघाटांची सफर' या लेखात, प्राचार्य जोशी यांनी त्यांच्या परिचित कुटुंबातील स्त्रियांविषयी बारीक-सारीक तपशील सांभाळून निर्देश केलेले आहेत. त्यांतील एकच वानगीदाखल पुरेसा आहे : "हरिभाऊंची पत्नी लक्ष्मीबाई ह्या कोकणस्थ स्त्रीचा एक नमुना होता. घवघवीत लांबट चेहरा, कपाळावर आडव्या कुंकवाची चिरी, नाकात टपोऱ्या मोत्यांची नथ, कानात तशाच साजेशा मोत्यांची कुडी आणि बुगड्या, खोप्यात अग्रफूल आणि मूद, असे त्यांचे ठसठशीत रूप होते."

अल्पसंबंधित अशा स्त्रियांविषयी चवीने केलेले रसाळ उल्लेख आणि पत्नी आणि कन्या यांच्याविषयी एकूणच तटस्थ भावना, हे खटकतेच !

वृत्तपत्रातील उमेदवारी, आकाशवाणीवरील निवेदकाची नोकरी आणि संस्थानिकपुत्रांना दिलेली शिकवणी यांकरिता प्रत्येकी एकेक प्रकरण खर्ची टाकणारे प्रा. जोशी स्वतःच्या प्राध्यापक पेशाविषयी किती कमी लिहितात ! या पेशातील तीन वर्षांचा केवळ अंतिम कालखंड त्यांना संस्मरणीय वाटावा आणि आधीच्या पुष्कळशा वर्षांविषयी काहीही महत्त्वाचे आठवू नये, हे खरोखरीच अतिविचित्र वाटते. सांगण्यासारखे काहीच त्या काळात घडले नाही की त्या काळाने काही संस्कारच केले नाहीत ?

'साठवणी'च्या निमित्ताने एक नवाच मुद्दा आता उपस्थित करावयाचा आहे. अनेक सुजनांच्या संदर्भात.तो अनेकवार सुचत आलेला आहे, छळत राहिलेला आहे. प्राचार्य जोशी यांना अनेकांनी अनेक प्रकारे साह्य केल्याचे ते आवर्जून नमूद करतात. त्याविषयी ते आजही कृतज्ञतेची भावना बाळगून आहेत हेही जाणवते. असेच आर्थिक साह्य किंवा जीवनात स्थिर होण्याकरिता केलेले साह्य, आजच्या अनेकानेक लेखकांना, कलावन्तांना आणि

नेत्यांना समाजातील कोणी ना कोणी केल्याचे आपण वाचतो. परंतु, त्यातील कोणीही त्या ऋणाची फेड केल्याचे मुळीच ऐकिवात नाही. सुस्थिती प्राप्त झाल्यावर असे ऋण हे सामाजिक ऋण मानून त्याची समाजाला परतफेड होणे आवश्यक आहे की नाही ?या संदर्भात, साह्य घेणाऱ्याचे काही एक दायित्व आहे की नाही ? हे दायित्व मान्य असेल तर त्या दिशेने अंशत: तरी प्रयत्न व्हावयास हवेत की नको ? या प्रश्नांची उत्तरे पूर्वीपासून अनुत्तरित आहेत आणि पुढेही त्यांना उत्तरे मिळण्याचा काही संभव आहे, असे मानावयास जागा नाही.

प्राचार्य जोशी यांचे या पुस्तकातील किंवा अन्य पुस्तकातील लेख वाचताना आणखी एक गोष्ट जाणवते. लेखनाला एक विशिष्ट आकृतिबंध देण्याचा ते जाणीवपूर्वक यत्न करतात असे दिसते. भाषेवर त्यांचे चांगले प्रभुत्व आहे आणि त्यांच्या सर्वच लेखनात वाचनीयता भरपूर असते. परंतु, प्रत्येक लेखाची अखेरी साधताना परिणामकारक वाक्यांचे पूर्वनियोजन होत असावे असे दिसते. किंबहुना जरा अधिक स्पष्ट सांगायचे तर ही अखेरी त्यांच्या मनात आधीच ठरलेली असते असे वाटते.

प्राचार्य रा. भि. जोशी यांच्या आत्मचरित्रवजा अशा या 'साठवणी' मुळे जे विचार मनात आले, ते मांडण्याचा प्रयत्न केलेला आहे. यांतील कोणताही विचार, कोणत्याही अभिनिवेशाने मांडलेला नाही. परंतु त्या विचारांविषयी, ते वाचकांनी मान्य करावेतच असा आग्रहही नाही. प्रथितयश लेखकाला जरा विशेष निकष लावून त्याची तपासणी केली तर ती धावगी ठरू नये.

**– उमाकान्त कृष्णा कीर**

---

**'काही आंबट काही गोड'** : शकुंतला परांजपे; श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०; पृष्ठे १४१; किंमत १५ रुपये.

---

'काही आंबट काही गोड' हा शकुंतलाबाई परांजपे यांनी लिहिलेला आठवणी, व्यक्तिचित्रणे यांनी मुक्त ललित लेखांचा संग्रह. सातत्याने गेल्या पंचवीस वर्षांहूनही अधिक काळ कुटुंबनियोजनाचे कार्य त्या करीत आलेल्या असून त्यांचे कार्य सर्वत्र मान्यताही पावलेले आहे. त्याशिवाय एक बुद्धिवादी, विचारी, संवेदनाशील असलेल्या महिला या नात्यांनी त्यांनी आजूबाजूच्या सतत परिवर्तन होत असलेल्या जगाचे केलेले निरीक्षणही अत्यंत महत्त्वाचे आहे. या संग्रहाद्वारे त्यांनी आपले अनुभव आंबट आणि गोड शब्दांत सर्वांसाठी ग्रथित केले हे महत्त्वाचे आहे. समृद्ध जीवन जगलेली संवेदनशील बुद्धिवादी व्यक्ती जेव्हा जेव्हा आपल्या अनुभवविश्वाचा मागोवा घ्यायला बघते, प्रामाणिकपणे अनुभूतीचा एकेक पदर बाजूला सरकवीत स्वत:लाच शोधते, मी'चे रेखाटन करत रहाते तेव्हाच 'काही आंबट काही गोड' सारखे वाचकांशी जिव्हाळ्याचे नाते जोडणारे पुस्तक तयार होते. आजी, अप्पासाहेब परांजपे, अप्पा कर्वे, अप्पा गाडगीळ इत्यादींची व्यक्तिदर्शने ओझरती असली, तरी अत्यंत प्रभावी आहेत. चालती बोलती व्यक्ती वाचकांपुढे उभी करण्यात त्यांची लेखणी यशस्वी झाली आहे. त्याबरोबरच चिंगी, लाडू या मार्जारांनी स्वत:च्या भाषेत सांगितलेली त्यांची सुख-दु:खे पुस्तकाची रुची अधिकच वाढवितात.

साधी, मृदू, मुलायम भाषा, त्यात नटवेपणा नाही. दोनचार वाक्यात घरगुती वातावरण उभे होते. लेखिका गमतीदार, चविष्ट भाषेत गप्पा छाटता छाटता मध्येच केव्हा चिमटा काढून जाते, थोडी बोचरी टीका करून जाते त्याचा पत्ताही लागत नाही.

जुने कपडे, आजीच्या किल्ल्या, आईच्या छत्र्या, आईची खरेदीची हौस या गबाळग्रंथातल्या चिजा अस्सल तर आहेतच; पण त्या सांगण्याचे लेखिकेचे कसबही वाखाणण्याजोगे आहे. स्कूटर चोरीतला विनोद किती अस्सल आहे हे सांगायलाच नको. वाचताना हासू आवरत नाही. 'देवाच्या देणगीत' विनोदाने सरकारी करांबद्दल सांगताना लेखिका एक चिरकालीन सत्य सांगून जाते, 'कोणताही चांगला शोध, नवी युक्ती हुडकली की तिचा सदुपयोग होतो तसा दुरुपयोगही होतो हेच माणसाचे दुर्दैव. तो एक समस्या सोडवतो व तो त्यातूनच अनेक समस्या निर्माण करतो.

पण लेखिकेने 'पिल्लू हरवले'च्या अखेरीस दिलेला धक्का जबरदस्त आहे. नेहमीच्या खेळकर, घरगुती शैलीत सांगितलेल्या या लेखाखाली कंसात आहे. 'इंग्रजी गोष्टीवरून' म्हणजे बाकीच्याही गोष्टीतले खरं काय, खोटं काय, कुठला मसाला इंग्रजीतला, कुठला फ्रेंच याचाच संभ्रम वाटावा. काहीही असले तरी चित्रणातल्या व्यक्ती खऱ्या आहेत. त्यात मी'चा चेहरा-मोहरा दिसतो. लिपस्टिक इंग्लिश मेकची असल्याने काहीच बिघडत नाही.

'मुले का नाही बिघडणार' हा लेख विचार करायला लावणारा, अंतर्मुख करणारा आहे. आज मुले खरोखर शाळांतून डांबली जातात. अभ्यासाच्या ओझ्याने वाकली जातात. मॉंटेसरी ते हायस्कुलातून बाहेर पडेपर्यंत आणि बाहेर पडताना जीवघेण्या स्पर्धेमुळे शेवटी निराश होतात. अभ्यासाच्या ओझ्याची जागा निराशेच्या ओझ्याने घेतली जाते. मॉंटेसरी ते हायस्कूलशाळा बाहेरचे क्लास, घरचा अभ्यास, सगळीकडे अभ्यास– यातून त्यांच्या व्यक्तिमत्त्व विकासाला कुठं वावच नसतो. हा सर्व अभ्यास कशासाठी याचा त्यांना स्वतःला पत्ताही नसतो. इथे लेखिकेने सुचविल्याप्रमाणे कितीतरी सुधारणा करता येतील. पण मांजराच्या गळयात ही घंटा बांधणार कोण? 'मरणाची मौज' मधली मरणाची वाट कशाला पहायची? आत्महत्त्या गुन्हा का? असाध्य रुग्णांना मारायचे किंवा मरू द्यायचे काय? या वरवर सोप्या वाटणाऱ्या प्रश्नांना लेखिका हात घालते. पण त्यावर सखोल विचार करायचे टाळते आणि मग उगीचच हे हातात धरले म्हणून एक विनोदी चुटका फेकून पलायन करते. टॅक्सीच्या पैशाबाबत एकमत झाले नाही म्हणून महत्त्वाच्या विषयापासून दूर होते.

'आवडीचे काम' मध्ये त्या जाताजाता सुखाचा कानमंत्र सांगून जातात. पुरुषांना विणावेसे का वाटत नाही? यातल्या गुदगुल्या मुळातून लेख वाचल्याशिवाय जाणवणार नाहीत. र. धों. कर्वे यांनी संततीनियमनाची एकाकी आघाडी कशी उभारली आणि अखेरपर्यंत ती जिद्दीने कशी चालविली तो इतिहास अगदी थोडक्या शब्दांत लेखिका नजरेसमोर उभा करते.

पुस्तक खाली ठेवताना एका प्रभावी, जिद्दी, मनस्वी व्यक्तिमत्त्वाशी ओळख झाल्याचा आनंद झाल्यावाचून रहात नाही.

— शामकांत कुलकर्णी

---

**'आद्य महाराष्ट्र आणि सातवाहन काल'** : रघुनाथ महारुद्र भुसारी; प्रकाशक : मराठी साहित्य परिषद, हैदराबाद; १९७९ पृ. २२१ किंमत २७ रु.

---

आद्य महाराष्ट्र आणि सातवाहनकाल हे श्री. र. म. भुसारी यांचे प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासावरील पुस्तक डॉ. श्री. व्यं. केतकरांच्या प्राचीन महाराष्ट्र शातवाहनपर्व विभाग २ रा यानंतर जवळ जवळ सुमारे ५० वर्षांनंतर प्रसिद्ध झाले. इतक्या विस्तृतपणे सातवाहन कालाविषयी माहिती देणारे कदाचित हे एकमेव पुस्तक म्हटले पाहिजे. या २२१ पृष्ठांच्या पुस्तकाची लेखकाने कालक्रमानुसार २१ प्रकरणे पाडली आहेत. प्रकरण पंधरापासून सातवाहनांच्या विविध परिस्थितीवर. उदा., शासनव्यवस्था, समाज-दर्शन, धार्मिक स्थिती, भाषा, कला इत्यादींवर विस्तृतपण लिहिले आहे; व त्यानंतर ६ परिशिष्टांत वंशवृक्ष, शक-यवनांचे आक्रमण, रोमन संस्कृतीचा प्रभाव, विक्रम संवत व शालिवाहन शक आणि नाणी यांवर चर्चा केली आहे. सुरुवातीस 'लेखकाच्या मनोगतात' लेखकाने आपल्या पुस्तकाचा हेतू स्पष्ट केला असून सुरुवातीस 'उत्खननांच्या आधारे जी उपयुक्त माहिती उपलब्ध आहे, तिच्याबाबत क्रमवार विचार करून उरलेल्या प्रकरणांतून सातवाहन कालावर प्रकाश टाकण्याचे ठरविले आहे.' अखेरीस संदर्भग्रंथ व सूची आहे. याशिवाय बारा चित्रपत्रे आहेत.

इतिहास आणि संस्कृती या पहिल्या प्रकरणात लेखकाने महाराष्ट्रातील विविध उत्खननांमधून उपलब्ध झालेल्या साधनांसंबंधी काही शंका व्यक्त करून इतिहास आणि संस्कृती यांचे विवेचन केले आहे. शिवाय कालमापनाच्या विविध शास्त्रीय पद्धतींसंबंधी थोडक्यात विवेचन केले आहे; तर इतिहासपूर्व प्राचीन काळ या प्रकरणात अश्मयुगाचे विविध टप्पे विशद करून त्यांची डॉ. सांकलिया

देव यांची मतें उद्‌धृत केली आहेत. ताम्रपाषाणयुग व लोहयुग या पुढील प्रकरणांत लेखकाने महाराष्ट्रातील विविध उत्खनित स्थलांचा दाखला देऊन तत्कालीन संस्कृतीची मोजक्या पण योग्य शब्दांत मांडणी केली आहे प्रकरणे ५ ते ८ यांत महाराष्ट्राचा प्राचीन वसाहतकाल, आर्य आणि द्राविड संस्कृतीचे संगमस्थान, प्राचीन जनपदे व पैठणचे अश्मक घराणे यांविषयी माहिती आहे. या प्रकरणांतून 'महाराष्ट्र' या नावाच्या व्युत्पत्तीपासून 'महाराष्ट्र' हे नाव प्रथम केव्हा प्रचारात आले; तसेच जनपदांचे सांस्कृतिक वैशिष्टय व पैठणच्या अश्मक घराण्याची माहिती– इत्यादी तपशील आढळतात. लेखकाने आपल्या अनुमानांसाठी विविध शिळाशासनांचा उपयोग तर केला आहेच, शिवाय इतरांच्या मतांचे साधार खंडण करण्याचा प्रयत्न केला आहे. सातवाहनकाळ (प्रकरण ९) ते उत्तरकालीन सातवाहन (प्रकरण १४) यात लेखकाने सातवाहन घराण्याचा विविध साधनांच्या द्वारे तपशीलवार इतिहास सांगितला असून प्रसंगोपात्त या घराण्यातील राजांच्या काळाविषयी चर्चा केली आहे. राज्यशासनव्यवस्था (प्रकरण १५), कलासंवर्धन (प्रकरण १०) यातून सातवाहन काळाविषयीची प्रशासनव्यवस्था, समाज, धार्मिक जीवन, कलात्मक प्रगती इत्यादींची माहिती मिळते. लेखकाने तत्कालीन संदर्भाद्वारे ही माहिती अधिक मनोरंजक व विश्वसनीय करण्याचा प्रयत्न केला आहे. यानंतरच्या परिशिष्टांत (१–६) लेखकाने अनेक वादग्रस्त मुद्यांचा ऊहापोह करून विक्रमसंवत व शालिवाहन शक या दोन ऐतिहासिक कालगणनांची सविस्तर चर्चा केली आहे. ती करताना त्याने इतर पूर्वसूरींची मते तसेच त्यासंबंधीचे संदर्भ मांडले आहेत आणि अखेरीस महाराष्ट्रातील प्राचीन नाण्यांची, विशेषतः आहत (पंच मार्कड) नाण्यांची सविस्तर माहिती दिली आहे. ही माहिती सांगत असताना महाराष्ट्रातील नाण्यांची प्राचीनता, परकीय नाणी, रोमनांचा भारताशी संपर्क व व्यापार इत्यादी गोष्टी वर्णिल्या आहेत. एकूण हे पुस्तक पूर्णार्थाने सातवाहनकालाशी संबद्ध असल्याने प्रस्तुत लेखकाने पूर्वी प्रसिद्ध झालेल्या सर्व संदर्भांचा सापेक्षतः विचार करून प्रसंगोपात्त जी मते आपल्याला पटत नाहीत; त्याचे साधार खंडन करण्याचा प्रयत्न केला आहे. एकूण या पुस्तकाचे स्वरूपच मुळी सातवाहन घराणे आणि त्याचा काल यांवर नवीन संशोधनात्मक दृष्टिकोनातून नवीन प्रकाश टाकणे हा आहे.

या पुस्तकाचे स्वाभाविकतः दोन भाग पडतात. प्रागैतिहासिक महाराष्ट्र व सातवाहनकालीन महाराष्ट्र. पहिल्या भागात लेखकाने महाराष्ट्रातील प्राचीन काळ– विशेषतः अश्मयुगीन अवस्था वर्णन करण्याचा प्रयत्न केला आहे. पण अपुरे अवशेष, काळासंबंधीची अनिश्चितता आणि, तत्संबंधीचे तोकडे संशोधन यांमुळे या भागावर काहीसा परिणाम झालेला दिसतो त्यामुळे हा भाग थोडासा विस्कळित, कालदृष्टया विसंगत वाटतो. अर्थात वरील मर्यादांमुळे कदाचित हे घडले असावे. मात्र दुसरा भाग हा वाचनीय नव्हे अभ्यसनीय आहे. लेखकाने अनेक संदर्भांचा योग्य तो उपयोग करून या काळावर फारच तपशीलवार लिहिले आहे. आतापर्यंत सातवाहन घराण्याविषयी इतके तपशीलवार, मुद्देसूद व संगतवार मराठीत कुणीच संशोधन केले नाही. दुसरी गोष्ट म्हणजे आंध्रभृत्य व सातवाहन या दोन नावांसंबंधीचा वाद. आंध्रभृत्य म्हणजेच सातवाहन– वगैरे गोष्टी लेखकाने नाणी, कोरीव लेख इत्यादी साधनांच्याद्वारे अतिशय स्पष्टपणे प्रथमच दाखवून दिल्या आहेत. सातवाहनांची वंशावळही उल्लेखनीय आहे.

पुस्तकाची भाषा ओघवती आहे, मात्र मुद्रित–दोष आढळतात. 'नागनिका' हा शब्द सातत्याने 'नायनिका' असा पडला आहे. तीच गोष्ट लांघजन > लांघणज याची आहे. अशोकाचा मृत्यू इ. स. पू. २३२ मध्ये झाला, असे आता मानले जाते, पण तो इ. स. पू. २३६ दिला आहे. (पृ. ५५) तळटीपांतून वारंवार वृत्तपत्रांचे संदर्भ दिले आहेत. वृत्तपत्रीय लेखनावर किती भरंवसा ठेवावा, हा विवाद्य मुद्दा आहे. तथापि इतिहासावरील पुस्तकाला असे संदर्भ विश्वसनीय मानू नयेत असे वाटते. एकूण हे पुस्तक इतिहासाच्या अभ्यासकाला उपयुक्त आहे, हे निःसंशय.

– सु. र. देशपांडे

**'बदनसीब'**: (कादंबरी) प्रतिभा रानडे; कॉंटिनेंटल प्रकाशन; पुणे १९७९; पृ. २५१; किंमत १६ रुपये.

'बदनसीब' ही ऐतिहासिक कादंबरी प्रतिभा रानडे यांच्या प्रतिभेचा एक वेगळा आविष्कार आहे. ह्या कादंबरीत त्यांनी इतिहास व कल्पित यांचे इतके बेमालूम मिश्रण केले आहे की इतिहास कोठला व कल्पित कोठले हे अलगद वेगळे काढता येत नाही. "मोंगलांचा शेवटचा राजा अबूजफर याला इंग्रजांनी हद्दपार केल्यामुळे त्याला आपल्या आयुष्याची अखेर अत्यंत अपमानास्पद स्थितीत ब्रह्मदेशात घालवावी लागली", हे ऐतिहासिक सत्य; परंतु ह्या ऐतिहासिक सत्याभोवती आपल्या कल्पकतेचा मोठा मनोज्ञ गोफ प्रतिभाबाईंनी आपल्या ओजस्वी भाषेने विणला आहे. त्यांच्या कादंबरीचा केंद्रबिंदू आहे आयुष्यभर नियतीशी टक्कर देणारा कविमनाचा बादशहा. अशा ह्या दुर्दैवी बादशहाच्या जीवनात अनेकदा सुसंधी चालून आल्या असतानासुद्धा बादशहाला त्यांचा पूर्णपणे उपभोग कधीच घेता येत नाही, तर त्यातून अनेक कटकटी निर्माण होऊन भुकेल्यासमोरून पंचपक्वान्नाने भरलेले ताट ओढून न्यावे तद्वतच बादशहाचे होते. ऐन तारुण्यात अकबरशहा बादशहानंतर वलिहाद होण्याचा मान अबूजफरचा असतानाही मुमताजमहल बेगमच्या आग्रहाने अकबरशहा बादशहा वलिहाद अबूजफरला न करता मिर्झा जहांगीरालाच करण्याचा प्रयत्न करतो; परंतु अबूजफरचे दैव जोरावर असल्याने त्याच्या मार्गातील एकएक काटा आपोआप दूर होऊन शेवटी कंपनी सरकार त्यालाच वलिहाद करते. वलिहादपदानंतर बादशहा होईपर्यंत मध्यंतरीचा काळ त्याच्या स्वप्निल वृत्तीत जातो. वलिहाद झाल्यानंतर आर्थिक टंचाईमुळे जे आपल्याला आता शक्य होत नाही ते आपण बादशहा झाल्यानंतर आपली स्वप्ने पूर्ण करू. परंतु बादशहापदाची सूत्रे हाती घेतल्यावर मात्र त्याला त्या जागेची बंधने कळतात. आपले हात कंपनी सरकारने किती बांधले आहेत ही कल्पना येते. सुरवातीला मुख्त्यार म्हणून नेमलेले कंपनी सरकार हळूहळू बादशहाकडून सर्व हक्क काढून घेते आहे याची कल्पना असूनही आपल्याला काहीच हालचाल करता येत नाही; त्यामुळे कविमनाच्या अबूजफरची खूप तडफड होते. कंपनी सरकारच्या अरेरावीने उत्तर हिंदुस्थान पेटून उठतो. दिल्लीच्या बादशहाला पुनश्च तख्तनशीन करून कंपनी सरकारचा अंमल मोडून काढण्यासाठी सामान्य जनता बादशहाकडून लढत होती. 'जिंकू किंवा मरू' ह्या निष्ठेने सामान्य रयत एकीकडे लढत असतानाच लाल किल्ल्यावरील उच्चपदस्थ मात्र इंग्रजांना फितूर होते; आलेल्या संधीचा फायदा घेऊन स्वार्थीपणाने इंग्रजांची हेरगिरी करीत होते. त्यामुळेच बादशहाला इंग्रजांकडून पराजय स्वीकारावा लागला व इंग्रजांनी बादशहाला पदच्युत करून रंगूनला पाठविले. तेथेच कुत्र्याच्या मौतीने बादशहा–ए हिंदोस्तान असलेल्या बहादूरशहा अबूजफरला मृत्यू आला.

प्रतिभाबाईंनी बादशहाचे रंगविलेले व्यक्तिचित्र वेधक आहे. सुरवातीचा उत्तम प्रतीचा घोडेस्वार, तीक्ष्ण नजरेचा अचूक तिरंदाज, कसलेला शिकारी, एक उत्कृष्ट शायर व वलिहाद होण्याची स्वप्ने बघणारा अबूजफर, वलिहाद पदासाठी इंग्रजांची मर्जी राखणारा अबूजफर, वलिहाद झाल्यानंतर बादशहा होण्यासाठी बादशहाच्या मरणाची वाट बघणारा अबूजफर, बादशहा झाल्यानंतर आपली सर्व स्वप्ने साकार होतील ह्या कल्पनेने सुखावलेला अबूजफर, बादशहा झाल्यानंतर बादशहापदाच्या काटेरी मुगुटाचे काटे टोचल्यानंतर विव्हल होणारा बादशहा, इंग्रजांशी निकराने लढणारा बादशहा, तर सर्वात शेवटी पदभ्रष्ट झाल्यानंतर अपमानास्पद जीवन जगणारा बादशहा; पण त्यातही त्याचा स्वाभिमान टिकून आहे. अगदी शेवटीही मरणासन्न स्थितीत असतानाही तो फादरचा उद्दामपणा सहन करू शकत नाही, तर फादरला तितक्याच ठामपणे खड्या आवाजात उत्तर देतो.

'हिंदियोंमे बू रहेगी जबतलक ईमानकी
तख्ते लंदनपर चलेगी तेग हिंदोस्तानकी'

असे बादशहाच्या व्यक्तिमत्त्वाचे पैलू प्रतिभाबाईंनी स्पष्ट केले आहेत; परंतु यापेक्षाही बादशहाच्या मनातील शायर, अतिशय नाजुकतेने त्यांनी स्पष्ट केला आहे. सुरवातीला शेरशायरीने फुलून जाणारा



अनुक्रमणिका

बादशहा शेवटी आपल्या मनातील उदासीनता, विषण्णता, औदासिन्ययुक्त विचार जेव्हा शायरीतून व्यक्त करतो, तेव्हा त्याचे व्यक्तिचित्र कारुण्यपूर्ण होऊन वाचकांची सहानुभूती मिळविते.

कादंबरीची जी पार्श्वभूमी आहे ती ऐतिहासिक असल्याने तीत कंपनी सरकारच्या इतिहासाचेही दर्शन घडते. ह्या कादंबरीतील इतिहासाने बादशहाच्या जीवनाला शोकात्म झालर लावलेली दिसते. ही कादंबरी व्यक्तिप्रधान असूनही कधी कधी व्यक्तिमनाचे अंतरंग उकलून दाखविताना इतिहासाच्या दाखल्यामुळे ती प्रसंगी कंटाळवाणीही वाटते. कादंबरीची भाषा ओघवती व गतिमान असली, तरी प्रसंगाची नाटयपूर्ण वर्णने ती वाचकांच्या डोळ्यापुढे उभी करत नाही. काही प्रसंगी ती रटाळही वाटतात.

ही कादंबरी वाचत असताना आठवण होते ती ना. ह. आपटे यांच्या 'संधिकाल' ह्या ऐतिहासिक कादंबरीची. त्या कादंबरीत रजपुतांच्या विनाशाच्या वेळची परिस्थिती आहे, तर ह्या कादंबरीत मोंगलांच्या विनाशाच्या वेळची परिस्थिती आहे. या दोहोतील ऐतिहासिक परिस्थितीतही असे साम्य आहे की ही राज्ये जी लयाला गेली ती राजे लोकांच्या नाकर्तेपणामुळे नसून स्वार्थीवृत्तीने शत्रुपक्षाला फितुर झालेल्या लाचखाऊ, संधीसाधू, मतलबी लोकांच्या कारवायांनी.

'बदनसीब' ह्या कादंबरीचा प्रामुख्याने भर आहे कविमनाच्या बादशहाची शोकात्म कहाणी गुंफण्याकडे. त्या दृष्टीने बादशहाची ही शोकान्तिका कलात्मकरीत्या हाताळण्यात लेखिका यशस्वी ठरली आहे. वाचक त्यांच्या ह्या कादंबरीचे स्वागत करतील असा विश्वास वाटतो.

**– सौदामिनी चौधरी**

---

## वाचकांचा पत्रव्यवहार–

संपादक 'नवभारत' यांस–

'नवभारत' मासिकाच्या ऑगस्ट १९७९ च्या अंकातील 'डुकर, वराह आणि डिग्री' या संपादकीयावरील श्री. पु. ल. देशपांडे यांची प्रतिक्रिया सप्टेंबर १९७९ च्या अंकात प्रसिद्ध झाली आहे. त्या प्रतिक्रियेत श्री. देशपांडे यांनी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने प्रसिद्ध केलेल्या माझ्या "बंडखोरीचे तत्त्वज्ञान" (अल्बेर कामूच्या 'THE REBEL' या ग्रंथाचे भाषांतर) या पुस्तकातील एक वाक्य उद्‌धृत केले आहे. हे वाक्य अर्थात मूळ भाषांतरित पुस्तकातील नसून, भाषांतरित पुस्तकाचा आशय सुबोध करण्याचे हेतूने मी लिहिलेल्या पुस्तकारंभीच्या प्रस्तावनेतील आहे.

या संदर्भात श्री. पु. ल. देशपांडे लिहितात : "माझा प्रश्न एकच आहे. ज्ञानाच्या भाषेच्या या पायरीपर्यंत पोचण्यासाठी 'बहिष्प्रज्ञात्मक', घटनासापेक्ष संकल्प' वगैरे शब्दांचे अर्थ खुलासेवार सांगणारी सुरवातीच्या पायऱ्यांची पुस्तके मराठीत आहेत का? तशी नसल्यामुळे हे मराठी (?) पुस्तक वाचायला त्या वाचकाला संस्कृत आणि इंग्रजी येणे आवश्यक नाही का?"

श्री. पु. ल. देशपांडे यांनी उद्‌धृत केलेले वाक्य हेगेलच्या "इतिहासाचे तत्त्वज्ञान" या महान ग्रंथातील भरतवाक्याचे मी केलेले मराठी भाषांतर आहे. वाक्य सामान्य वाचकास समजण्यास कठीण असू शकेल. पण, मी योजिलेले पारिभाषिक शब्द पूर्ण विचारान्तीच योजिले आहेत. Objective या शब्दाचे भाषांतर 'बहिष्प्रज्ञात्मक' का, 'वस्तुनिष्ठ' का नाही याचा खुलासा करता येईल. परंतु प्रस्तावनेत ते शक्य नव्हते. शिवाय, शब्दांचे अर्थ खुलासेवार सांगूनही, हेगेलचे तत्वज्ञान चांगले समजेल इतके ते सोपे नाही. मूळ जर्मन भाषेत

असलेल्या हेगेलच्या तत्त्वज्ञानाच्या ग्रंथांची इंग्रजीतून भाषान्तरे झाली आहेत. याशिवाय, हेगेलच्या तत्त्वज्ञानाची ओळख करून देणारे स्वतंत्र ग्रंथ जगातील अनेक थोर विचारवन्तांनी लिहिले आहेत. तरीही हेगेल समजायला कटीणच. "पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा इतिहास" या आपल्या इंग्रजी पुस्तकात बर्ट्रान्ड रसेल हा थोर तत्वज्ञ तशी कबुली देतो. मराठी भाषेत श्री. दि. के. बेडेकर यांचा 'हेगेलचे तत्त्वज्ञान' हा मोठा ग्रंथ आहे. पुस्तक कठीण, क्लिष्ट व शब्द संस्कृतोद्भव असतील; पण हेगेल समजण्यासाठी, शिखर नाही तरी पायथा गाठण्यास हे पुस्तक मराठी इच्छुकास खासच उपयुक्त आहे. तळमळ मात्र हवी.

आणखी एक महत्वाचा मुद्दा असा. हेगेलच्या बाबतीत पारिभाषिक शब्दार्थांचा प्रश्न अडचणीचा आहे. त्याने योजिलेल्या जर्मन शब्दांचे इंग्रजीत यथायोग्य अर्थवाही भाषान्तर करणे अनेक ठिकाणी जमलेले नाही. कारण, तसे अर्थवाही योग्य शब्द ईंग्रजीत नाहीत. आपल्या इकडे, गीता, उपनिषदे, योगशास्त्र, वेद, वगैरे ग्रंथान्तर्गत भारतीय तत्त्वज्ञान आणि पाश्चात्य तत्त्वज्ञान यांच्यात अनेक साम्य-विचार आहेत. भारतीय तत्त्वज्ञानविषयक प्राचीन ग्रंथांची मराठीतून भाषांतरे झाली आहेत आणि त्यात बरेच योग्य अर्थवाही संस्कृत शब्द आढळतात. मराठी भाषेची जननी ज्ञानेश्वरी– त्या ज्ञानेश्वरीत अनेक अर्थवाही तत्त्वज्ञानात्मक संस्कृत शब्द आहेत (तिची हजारो पारायणे करतात). या साऱ्या शब्दांची उपयुक्तता पाश्चात्य विज्ञान–तत्त्वज्ञान-विषयक अनेकविध इंग्रजी ग्रंथांचे भाषांतर करताना सुलभ व अपरिहार्य ठरते. म्हणून, उच्च ज्ञानाची तोंडओळख करून देण्यासाठी सोपी पुस्तके लिहावयाची म्हटले तरीसुद्धा संस्कृत शब्दांची योजना अटळ ठरते.

आइन्स्टाइनचा 'सापेक्षता सिद्धांत' घ्या. त्यावर 'ABC of Relativity', 'Relativity Made Easy' अशी अनेक 'सोपी' पुस्तके आहेत. पण अजूनही मोजक्याच व्यक्तींना तो सिद्धांत समजतो. म्हणून, "ललित आणि ललितेतर साहित्याच्या वरच्या पातळीवर न्यायचं असेल, तर कळतील अशी सोपी पुस्तके लिहावयास हवीत" म्हणजे नक्की काय?

या संदर्भात, माझी फारा दिवसांची वेगळीच व्यथा आहे. ती मी आता बोलून दाखवितो. उच्च ज्ञानाची तोंडओळख करून देणाऱ्या पुस्तकांविषयी श्री. पु. ल. देशपांडे लिहितात. पण, ही तोंड-ओळख करून घेण्याची आस्था आपल्या मराठी ललित व ललितेतर साहित्यिकांत कितपत आहे? ("नवभारताचे' संपादकीय वाचावे अशी आपली ताकद नाही" हे पु. लं. चे उद्गार विनम्रतेच्या सदरात मोडतात असे मी समजतो). माझी व्यथा आहे म्हणूनच मी माझ्या 'बंडखोरीचे तत्त्वज्ञान' या पुस्तकाचे उदाहरण घेतो. हे पुस्तक मी श्री. पु. ल., देशपांडे, श्री. प्रभाकर पाध्ये, श्री. अनंत काणेकर, श्री. श्री. के. क्षीरसागर अशा नामवंत साहित्यिकांना व समीक्षकांना अभिप्रायार्थ भेट म्हणून प्रत्यक्ष भेटून दिले होते. अभिप्रायाची सक्ती नाही. पण मी म्हणतो, माझे भाषांतरित पुस्तक राहू द्या, निदान मूळ इंग्रजी पुस्तकाची तरी गुणग्राहकता हवी. समकालीन राजनीतीच्या तत्त्व-ज्ञानाचा तो महान ग्रंथ, अल्बेर कामू या नोबेल पारितोषिक विजेत्या विचारवंताचे आमच्या आजच्या इतिहास कालखंडाशी निगडित असे मौलिक राजनैतिक तत्त्वज्ञान त्यात आहे. फ्रेंच राज्यक्रांतीची उत्तरमीमांसा, दोस्तोयेवस्की, नीत्शे, हेगेल यांच्या राजनैतिक तत्त्वज्ञानाचा प्रभाव, मार्क्सवादावरील सर्वोत्कृष्ट समीक्षा, कला नि साहित्य विचार–सारेच काही श्रेष्ठ व प्रभावित करून सोडणारे.

कामूच्या महान विचारधनाची निदान तोंड-ओळख या निमित्ताने तरी "बंडखोरीचे तत्त्वज्ञान" या मराठी पुस्तकाची दखल घ्यावयास हवी होती, असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही. पण या प्रभावी पुस्तकाचा आमच्या साहित्यिकांवर काहीच प्रभाव पडू नये, हे दुर्दैव म्हणावे काय? महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत 'नवभारत' मासिकास याची कधीकाळी जाग येईल देव जाणे! *

* 'नवभारत' कडे लेखकाकडून वा प्रकाशकाकडून पुस्तकाची प्रत **अभिप्रायार्थ आल्याशिवाय** त्यावर अभिप्राय देता येणे शक्य नसते, हे श्री. मराठे यांनाही मान्य व्हावे. – का. संपादक.

अनुक्रमणिका

श्री. पु. ल. देशपांडे यांनी, केवळ शब्दार्थांचा वाद उपस्थित न करता भाषांतरित पुस्तकाच्या आशयावर म्हणजेच कामूच्या मौलिक विचारांवर चार शब्द लिहिले असते तर बरे झाले नसते काय? मी केलेल्या भाषांतराच्या सुबोधतेविषयी उत्तम अभिप्रांय आहेत. तेव्हा पुस्तक आमच्या मराठी साहित्यिकांच्या डोक्यावरून गेले असे म्हणता येणार नाही. समकालीन भारतीय राजकारणात सक्रीयरीत्या भाग घेणाऱ्या आजच्या राजकीय नेत्यांच्या (आणि मंत्र्यांच्या) बाबतीत मात्र आव्हानपूर्वक ठामपणे म्हणता येईल की, कामूचेच काय, पण इतर कोणतीही उच्च विचारसरणी त्यांच्या डोक्यावरून जाईल. त्यांचे राजनैतिक तत्त्वज्ञानाशी नाते नाही. हेगेल राहू द्या! मार्क्स आणि त्याचे समाजवादी तत्त्वज्ञानही त्यांनी आत्मसात केलेले नाही. 'नवभारत' मासिकात प्रसिद्ध होणारे श्री. प्रभाकर पाध्ये यांचे मार्क्सवादावरील विचारप्रवर्तक लेख त्यांच्या खिजगणतीत नसतील. तसे असते तर सदानकदा समाजवाद नि लोकशाहीचे गोडवे गाणारे हे नेते समाजवादाच्या स्वप्नरंजनातून आणि सत्तेच्या राजकारणातून बाहेर पडून मार्क्सवादाच्या पलीकडे गेले असते आणि अधःपतित राजकारणात कुजत राहिले नसते.

"सकळ जनांना हळूहळू शहाणे करावे" ही तळमळ ठीक आहे. पण, विद्वज्जनच विद्वान व्हावयास हवेत त्याचे काय? वस्तुस्थिती अशी आहे की, कथा, कादंबऱ्या, कविता, नाटके आणि आता दलित वाङ्मय यांचाच आमच्याकडे सुकाळ झाला आहे. गीतारहस्य, वैदिक संस्कृतीचा विकास, हेगेलचे तत्त्वज्ञान अशा दर्जाची किती पुस्तके प्रसिद्ध होतात? महाराष्ट्रराज्य साहित्य संस्कृती मंडळाने मराठीत भाषांतर करून प्रसिद्ध केलेल्या पाश्चात्य अभिजात ग्रंथांना व उच्च साहित्यामधील निवडक पुस्तकांना आमच्या मराठी साहित्यिकांचा व समीक्षकांचा प्रतिसाद किती? आणि त्यांचा प्रसार किती? 'नवभारता' सारख्या वैचारिक मासिकांचे स्थान काय? पारिभाषिक शब्दार्थांच्या वादापेक्षा हे प्रश्न महत्त्वाचे नाहीत काय?

—भि. वि. मराठे

---

श्री. संपादक, 'नवभारत' यांस,
स. न. वि. वि.

आपला नवभारतचा सप्टेंबर १९७९ चा अंक वाचण्यात आला. त्यात 'नागपूरकर भोसल्यांचा इतिहास' या पुस्तकावरील श्री. ग. ह. खरे यांचे समीक्षण वाचले. संपादकांपैकी मी एक असल्यामुळे त्याबाबतीत योग्य तो खुलासा देणे मला कर्तव्य वाटते, म्हणून हा प्रपंच!

श्री. खरे यांच्याबद्दल पूर्ण आदर असूनही हे परीक्षण वाचून ग्रंथातील केवळ जास्तीत जास्त चुका काढाव्यात म्हणूनच त्यांनी हे समीक्षण केले आहे, असा माझा समज झाला आहे. दोष दाखविणे हा समीक्षकांचा मूलभूत हक्क. पण दोषाबरोबर गुण दाखविणे हे तितकेच त्यांचे महत्त्वाचे कर्तव्य. खरे म्हणतील यात गुण नाहीतच! तर तो त्यांचा अतिरेकी अहंगड!

केवळ दोष काढण्याचे ठरवूनच खरे हे समीक्षा करण्यास बसल्यामुळे त्यांना अनेक ठिकाणी विसंगतीचे धोरण पत्करावे लागले. कै. सरदेसाई यांचे ग्रंथ आधारभूत साधनग्रंथ नव्हेत, असे आपले मत खऱ्यांनी ठासून मांडले आहे. पण त्याच लेखात वा. ना. सहस्रबुद्धे यांच्या भोसल्यांच्या बंगालवरील स्वाऱ्या हे पुस्तक आम्ही उपयोगात आणले नाही, असे ते म्हणतात. हे पुस्तक केवळ संकलनात्मक आहे असे पुन्हा खरेच म्हणतात. म्हणजे केवळ संकलनात्मक पुस्तक गाळले म्हणून संपादक दोषी आणि ज्या रियासतीचा खरे सोडून इतर सर्वजण आधार घेतात त्या रियासतीचा आधार घेतला म्हणूनही संपादक दोषीच! आणि मग संकलनात्मक ते एकच पुस्तक का? त्यासारखी किंवा त्याच्यापेक्षा सरस अनेक पुस्तके आहेत. उदा., मराठ्यांचा दरारा अथवा मराठ्यांच्या बंगालवरील स्वाऱ्या हे श्री. वा. गो. आपटे यांचे पुस्तक, 'शेर मुताखरीन' हे सय्यद गुलामहुसेन यांचे पुस्तक, इत्यादी. कदाचित इतरांच्या अभ्यासातील त्रुटी काढणाऱ्या खऱ्यांच्या वाचनात केवळ संकलनात्मक ते एकच पुस्तक आले असावे.

प्रस्तुत संपादकांना 'नागपूरकर भोसल्यांचा नवीन इतिहास लिहावयाचा नव्हता. केवळ जुन्या पुस्तकातील घटनांबाबत काही नवीन संशोधन असल्यास

ते जोडावयाचे होते. नवीन वादग्रस्त प्रश्नांची चर्चा करावयाची नव्हती. या आमच्या मर्यादा आणि बंधने मृत लेखकांच्या पुस्तकाची नवीन आवृत्ती काढताना सर्वांनाच असतात. खऱ्यांना हे सर्व माहित आहे, असा आमचा समज आहे. नवीन शेजवलकरांचे नागपूर अॅफेअर्स आणि वैद्य दप्तरातील पत्रे यात एकूण १०७० पत्रे असून त्यांपैकी केवळ सात पत्रांचा आम्ही उपयोग केला आहे, असे खरे सांगतात. प्रथम सात हा आकडा श्री. खऱ्यांनी पुन्हा नीट तपासून पहावा. खऱ्यांनी सांगितलेली सर्व पत्रे माझ्या संग्रही आहेत. शेजवलकर अफेअर्समध्ये नागपूरच्या सामाजिक जीवनाची सुंदर माहिती आहे. वैद्य दप्तरात बहुतेक सावकारी पत्रव्यवहार आहे. ऐतिहासिक मूल्य दोघांतही त्यामानाने फार कमी. जे आहे, त्याचा आम्ही सर्व उपयोग करून घेतला आहे. याशिवाय काही असल्यास ते आम्हाला सांगावे अशी आमची त्यांना विनंती आहे. असे त्यांना आम्ही नम्र आव्हान करतो. प्रस्तुत ग्रंथात शेजवलकरांच्या नागपूर अफेअर्सच्या भरंवशावरच तर मी संपूर्ण परिशिष्ट क्रमांक तीन आणि चार लिहिले आहे. तळटीपांत ते नमूद आहे.

शेजवलकरांचे नागपूर अफेअर्स, वैद्य दप्तरातील इतर सर्व पत्रे आणि खऱ्यांना महत्त्वाचे वाटलेले वा. ना. सहस्रबुद्धे यांचे 'भोसल्यांच्या बंगालवरील स्वाऱ्या' हे पुस्तक इतिहासाच्या पुस्तकापेक्षा ऐतिहासिक कादंबरी लिहिण्याच्या अधिक उपयोगाचे आहेत. त्याचा मी माझ्या नागपूर भोसल्यांवरील ज्या दोन कादंबऱ्या ( राजबैरागी आणि राजश्री) प्रसिद्ध झाल्या त्यांत भरपूर उपयोग करून घेतला आहे. अर्थात माझ्या कादंबऱ्यांचा उल्लेख केवळ खऱ्यांनी संपादकांचा जुन्या कागदपत्रांचा अभ्यास कमी पडला हा सरळसोट आरोप केला असल्यामुळेच करावा लागत आहे.

पृष्ठ १४० वरील टीपा २५९ ते २६० बद्दल श्री. खरे यांनी बरेच लिहिले आहे. अर्थात या टीपा ठाण्याचे श्री. मुकुंदराव आगासकरांच्या असल्यामुळे त्यांच्याविषयी मला कांहीच सांगता यावयाचे नाही.

इतरही अनेक तांत्रिक चुकांची जंत्री श्री. खरे यांनी उभी केली आहे. पण त्याबद्दल कुणीही संपादक जबाबदार नाहीत, इतकेच या ठिकाणी सांगितले म्हणजे पुरे !

'पुण्यातील लोकांना विद्वत्तेचा एक अहंगंड आहे, विदर्भातील लोकांकडे पहाण्याचा त्यांचा दृष्टिकोन नेहमी तुच्छतेचा असतो' असा समज इकडच्या फार लोकांमध्ये आहे. 'विद्वत्तेचा, चिकित्सकतेचा ठेका आपल्याकडे असल्यामुळे वैदर्भीय' लोकांत उजवे काही असूच शकत नाही; असल्यास डावेच असू शकते' हा समज येथील सुशिक्षित आणि लेखक वर्गातही आहे. मला वाटते हा समज दूर व्हावा. श्री. खऱ्यांसारख्या विद्वानांनी त्यात पुढाकार घेतल्यास पुढे दोनशे वर्षांनी महाराष्ट्राचा इतिहास लिहिला गेल्यास त्यात खऱ्यांचा उल्लेख निश्चितच गौरवाने केला जाईल !

**गो. मा. पुरंदरे**

---

सम्पादक "नवभारत" यांस

स. न. वि. वि.

"नवभारताच्या" सप्टेंबर महिन्याच्या अंकात श्री. ग. ह. खरे यांचे "नागपूरकर भोसल्यांचा इतिहास" या ग्रंथावरील जे परीक्षण आलेले आहे ते माझ्या वाचण्यात आले. ह्या ग्रंथाचा एक सम्पादक ह्या नात्याने खुलासा करणे आवश्यक वाटल्याने हे पत्र लिहीत आहे. दुसरी बाजू समोर येणे आवश्यक असल्याने हे पत्र जरूर छापावे ही विनंती.

श्री. ग. ह. खरे यांच्या संशोधन वृत्तीबद्दल आणि विद्वत्तेबद्दल मला नितांत आदर आहे. परंतु तरीसुद्धा ह्या ग्रंथाचे परीक्षण करताना त्यांचा तोल निश्चित गेला असे मोठ्या खेदाने नमूद करावे लागते.

यादव माधव काळे यांचे 'नागपूर प्रांताचा इतिहास" ह्या ग्रंथाचे पुनःप्रकाशन करण्याचे जेव्हा ठरविण्यात आले त्यावेळी मूळ ग्रंथ जशाचा तसा छापावा असे विदर्भ संशोधन मंदिराचे कार्यकारी अध्यक्ष डॉ. वा. वि. मिराशी यांनी ठरविले होते. परंतु आत्तापर्यंत भोसल्यांसंबंधी बरेच संशोधन झाले असल्याने त्यातल्या त्यात निदान महत्वाच्या घटनांचा तरी परिशिष्टात आणि तळटीपांत उल्लेख

करावा असा आग्रह आम्ही धरला. त्यावेळी कोठे संपादक-मंडळ नेमण्यात आले. संपादकमंडळाने ह्या ग्रंथाचे पुनःप्रकाशन करताना मूळ ग्रंथातील मतांना, भाष्याला किंवा निष्कर्षांना कोणीही हात लावू नये, परंतु काही नवीन घटना समोर आल्या असल्यास किंवा जुन्या घटनांबाबत काही नवीन माहिती समोर आली असल्यास तिचा उल्लेख तळटीपांत करावा असे धोरण ठेवले. संपादक मंडळाच्या संपादनाला पडलेली ही मर्यादा श्री. ग. ह. खरे यांनी लक्षात घ्यावयास हवी होती. संपादक मंडळाला नागपूरकर भोसल्यांसंबंधी नवीन ग्रंथ लिहावयाचा नव्हता किंवा नवीन भाष्य, नवीन मते मांडून मूळ लेखकाचा अवमानही करावयाचा नव्हता.

माझ्याकडे "जानोजी भोसले आणि त्याचा काळ" हा भाग संपादनाकरिता आला. त्यासंबंधी आता "डाक्टोरल प्रबंधाकरिता मी हाच विषय निवडल्याने त्या विषयाचे कोणतेही निर्देश, संदर्भ किंवा अवांतर ग्रंथ पहाण्याचे किंवा मनन करण्याचे राहून गेले ही गोष्ट सर्वस्वी अशक्य आहे. ह्यातही मी इंडिया ऑफीस लायब्ररी, लंडन येथून आत्तापर्यंत अप्रकाशित अशा सात बखरी आणल्या. विनायकराव औरंगाबादकर यांनी त्या भोसल्यासंबंधीच लिहिल्या आहेत. ह्या मूळ साधन-ग्रंथांचाही मी ह्या ग्रंथाकरिता उपयोग करून घेतला आहे. तेव्हा वैद्य दप्तर आणि शेजवलकराचे नागपूर अफेअर्ससंबंधीचे दोन भाग यांचा मी उपयोग करून घेतला नसेल ही गोष्ट अशक्यप्राय आहे. ह्यापैकी वैद्य दप्तरान सावकारी घडामोडी आलेल्या आहेत तर नागपूर अफेअर्समध्ये भोसलेकालीन सामाजिक जीवनाचे प्रतिबिंब आहे. अशा परिस्थितीत ह्या ग्रंथात काही राजकीय घडामोडी आल्या असतील तर त्या जरूर दाखवून द्याव्यात अशी खऱ्यांना माझी खास विनंती आहे.

श्री. पुरंदरे आणि श्री. आगासकर यांनीही आपआपल्या भागाचे अशाच प्रकारे कसून संपादन केले आहे. त्यांची बाजू ते मांडतीलच. परंतु त्यांच्याही भागात भोसल्यासंबंधी कोणत्याही महत्त्वाच्या घडामोडी सुटलेल्या नाहीत असे मी खात्रीपूर्वक सांगू शकतो.

अशा स्थितीत "संपादकांचा अभ्यास कमी पडला असावा", "काही ग्रंथ पाहिले नसावेत" इत्यादि खऱ्यांनी केलेली विधाने वस्तुस्थितीला धरून नाहीत असे मोठ्या खेदाने म्हणावे लागते. नागपूर-विदर्भातील संशोधकांकडे थोडे पूर्वग्रहदूषित दृष्टीने पाहिले जाते असेच ह्यावरून समजावयाचे काय ?

– श. गो. कोलारकर

# सार-संकलन

देश

## लोकनायकांचे निधन

श्री. जयप्रकाशक नारायण यांचे ८ ऑक्टोबर १९७९ रोजी पहाटे ५-४५ वाजता झोपेत निधन झाले.

भारताच्या स्वातंत्र्यचळवळीत सेनानीचा दर्जा असलेला शेवटचा भारतीय काळाच्या पडद्याआड गेला. स्वातंत्र्याच्या चळवळीतील ध्येयांची आणि आदर्शांची लोकांच्या मनात आणि राष्ट्रीयकार्यक्रमात पुनःस्थापना करण्यासाठी त्यांनी जी झुंज आपल्या आयुष्याच्या अखेरच्या पर्वात दिली तिला स्वातंत्र्यानंतरच्या भारताच्या इतिहास तोड नव्हती.

"तुम्हाला माहीत आहे की मी आता एक म्हातारा माणूस आहे. माझे जीवितकार्य करून झाले आहे. प्रभाच्या मृत्यूनंतर माझ्यापाशी स्वतःचे असे काही उरलेले नाही, जिच्यासाठी म्हणून जगावे अशी व्यक्ती राहिलेली नाही. माझा भाऊ आणि पुतणे यांना त्यांची त्यांची कुटुंबे आहेत; माझ्या धाकटया बहिणीला (थोरली बहीण अनेक वर्षीपूर्वीच गेली) तिचे मुलगे, मुली आहेत. माझे शिक्षण आटोपल्यानंतर माझे सर्व आयुष्य मी देशाला दिलेले आहे आणि त्याच्या बदल्यात मी काहीही मागितलेले नाही. तेव्हा तुमच्या राजवटीत एक कैदी म्हणून मी समाधानाने मरू शकेन.

अशा माणसाचा सल्ला तुम्ही ऐकाल का ? ह्या राष्ट्राच्या पित्यांनी-आणि त्यांच्यात तुमच्या थोर वडिलांचाही समावेश होतो-त्याचा जो पाया बांधला आहे तो नष्ट करू नका. जो मार्ग तुम्ही चोखाळता आहात त्याच्यातून झगडे आणि दुःख यांच्याशिवाय दुसरे काहीही निष्पन्न होणार नाही. तुम्हाला एक महान् परंपरेचा, उदात्त ध्येयांचा आणि एकंदरीत सुरळीत पण काम देणाऱ्या लोकशाहीचा वारसा मिळाला आहे.

त्याची मोडतोड करून ती तुमच्या मागे ठेवू नका. कारण हे सगळे परत रचायला खूप वेळ लागेल. ते सर्व परत रचण्यात येईल ह्याविषयी माझ्या मनात तिळमात्र शंका नाही. ज्या जनतेने ब्रिटिश साम्राज्यशाहीशी लढा दिला आणि तिला नमविले ती हुकूमशाहीची लज्जास्पद, अप्रतिष्ठेची स्थिती अमर्याद काळपर्यंत सहन करील हे शक्य नाही. माणसाचे चैतन्य तुम्ही कितीही खोलवर दडपू शकाल; पण ते जिंकून आपल्या काबूत तुम्हाला कधीही ठेवता येणार नाही." (जुलै २१, १९७५ रोजी त्या वेळच्या पंतप्रधानांना लिहिलेल्या पत्रातून)

## लोकनायकांचे स्वप्न

माझ्या स्वप्नातील भारत असा असेल : ज्या समाजातील प्रत्येक व्यक्ती, प्रत्येक साधन, सामग्री, दुबळचांच्या सेवेसाठी असेल असा तो समाज असेल. अंत्योदयाला वाहून घेतलेला तो समाज असेल; शेवटच्या माणसाच्या, दुबळचातल्या दुबळचा माणसाच्या कल्याणाला वाहून घेतलेला तो समाज असेल. ज्या समाजाच्या सर्व व्यवहारात प्रत्येक व्यक्ती सहभागी असेल असा समाज म्हणजे माझ्या स्वप्नातील भारत...

त्या समाजातील अधिकारी आणि लोकप्रतिनिधी जनतेचे सेवक असतील. ते जर चळले तर त्यांना वठणीवर आणण्याची संधी लोकांना हक्काने मिळेल. अधिकारस्थान हा कुणाला मिळालेला विशेषाधिकार असणार नाही, तर विश्वस्त म्हणून काही लोकांकडे सोपविलेला तो न्यास (ट्रस्ट) असेल.

थोडक्यात, भविष्यातील भारताचे जे माझे दर्शन आहे ते स्वतंत्र, प्रगतिशील, गांधीवादी भारताचे

अनुक्रमणिका

दर्शन आहे. ( मार्च १५, १९७७ ला राष्ट्राला दिलेल्या संदेशातून. )

## परदेश

### पाकिस्तानामध्ये स्थिर सरकार

नोव्हेंबर १७ ला जी सार्वत्रिक निवडणूक पाकिस्तानमध्ये होणार होती ती राष्ट्राध्यक्ष झिया-उल्‌हक ह्यांवी अनिश्चित कालपर्यंत पुढे ढकलली आहे. सर्व राजकीय पक्षांवर बंदी घालण्यात आली आहे आणि वृत्तपत्रांवर सेन्सॉरशिप लादण्यात आली आहे.

लष्करी कायदा आता खऱ्याखुऱ्या अर्थाने अंमलांत येईल असे झिया ह्यांनी जाहीर केले आहे. संप आणि टाळेबंदी, सभा आणि मिरवणुका ह्यांच्यावर बंदी घालण्यात आली आहे आणि राष्ट्रविरोधी कारवाई करणारे छापखाने जप्त करण्यात आले आहेत. "राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीने सध्याची अनिश्चित परिस्थिती निकालात आणण्यासाठी ही पाउले टाकण्यात आली आहेत" असे आपल्या लोकांना उद्देशून त्यांनी जाहीर केले. ह्या सर्व हूकुमांना कायद्यांचे स्वरूप देण्यात आले आहे.

राष्ट्राला उद्देशून नभोवाणीवरून केलेल्या भाषणात राष्ट्राध्यक्षांनी असे सांगितले की १७ नोव्हेंबराला निवडणूक घेतल्याने राष्ट्रात स्थैर्य निर्माण होणार नाही अशी त्यांची खात्री पटली आहे. "केवळ निवडणुकांसाठी निवडणुका घेतल्याने काही साधत नाही. प्रातिनिधिक सरकार सत्तेवर आणणे ही गोष्ट महत्त्वाची असते." झिया यांचे लष्करी सरकार समाजातील सर्व दुष्ट आणि अनिष्ट गोष्टी उखडून टाकण्यासाठी सक्त कारवाई करणार आहे. ह्यासाठी इस्लामच्या सर्व कायद्यांची कडकपणे अंमलबजावणी करण्यात येईल अशी अपेक्षा आहे. बऱ्याच लष्करी अधिकाऱ्यांना बढती देणे आता क्रमप्राप्त आहे कारण चोख इस्लामी राज्याची स्थापना पाकिस्तानमध्ये करण्याची जबाबदारी मुख्यत्वे त्यांच्यावरच पडणार आहे.

एकंदर २८९ राजकीय पुढाऱ्यांना व कार्यकर्त्यांना पकडण्यात आले आहे. ह्यांच्यांत गृहबद्ध करण्यात आलेल्या बेगम नसरत भुत्तो आणि कु. बेनझीर भुत्तो यांचा समावेश आहे. काळाबाजार, साठेबाजी आणि अन्नपदार्थांत भेसळ करणे, इ. गुन्ह्यांचा बंदोबस्त करण्यासाठी फिरती लष्करी न्यायालये ह्या गुन्ह्यांसाठी भरण्यात आलेले खटले चालविणार आहेत ; आणि पाच वर्षांची कैद, दंड आणि सार्वजनिक ठिकाणी फटके मारणे ह्या शिक्षा ह्या गुन्ह्यांसाठी मुक्रर करण्यात आल्या आहेत.

वर्तमानपत्रे आणि नियतकालिके ह्यांच्यात प्रसिद्ध करायचा मजकूर प्रसिद्धिपूर्व तपासणीसाठी लष्करी अधिकाऱ्यांकडे सुपूर्द केला पाहिजे असे हुकूम सोडण्यात आले आहेत.

फिरत्या लष्करी न्यायालयाबरोबर, शिक्षा देण्यात आलेल्या आरोपींना फटके मारण्यासाठी आवश्यक असलेली लाकडी चौकट नेण्यात येते. मुलींची टिंगल करणाऱ्या दोन तरुणांना, साठेबाजी केलेल्या दोन व्यापाऱ्यांना आणि पोलिस अधिकाऱ्यांनाही फटके मारण्यात आले आहेत.

व्यापाऱ्यांना आपापले साठे बाहेर काढण्यासाठी सात दिवस देण्यात आले आहेत आणि भेसळ घातलेले पदार्थ नष्ट करायला दोन दिवस देण्यात आले आहेत. व्यापाऱ्यांनी घाबरून सरकारशी सर्व प्रकारचे सहकार्य करायचे मान्य केले आहे मुंबईकरांना आनंद देईल अशी एक गोष्ट अशी की टॅक्सी–ड्रायव्हर्सना आपापले मिटर्स दुरुस्त करायला दोन दिवस देण्यात आले आहेत; आणि लोकांशी सभ्यतेने वागण्याचे आदेशही त्यांच्यासाठी सोडण्यात आले आहेत.

भारतीय नागरिकांच्या दृष्टीने पाकिस्तानात प्रस्थापित झालेले हे लष्करी सरकार ही अत्यंत उपयुक्त गोष्ट आहे. कारण स्थिर सरकार अस्तित्वात येण्यासाठी व टिकवून धरण्यासाठी कोणकोणते मार्ग उपलब्ध असतात आणि स्थिर सरकारचे परिणाम काय होतात ह्याचे एक प्रात्यक्षिक त्यांना शेजारच्या राज्यात बघायला मिळत आहे. उदा. एक बातमी अशी आहे की राजकीय कार्यकर्त्यांची आणि सराइत गुंडांची धरपकड करण्यात आली आहे. पाकिस्तान पीपल्स पार्टीचे अनेक पुढारी भूमिगत झाले आहेत आणि पोलिस त्यांना शोधून काढण्यासाठी छापे घालीत आहेत.

## पाकिस्तानात अणु–अस्त्रे

पाकिस्तान अणु-अस्त्रे निर्माण करू पहात आहे ह्यामुळे गंभीर परिस्थिती निर्माण झाली आहे असे अमेरिकेचे म्हणणे आहे.

पाकिस्तानचे परराष्ट्रमंत्री श्री आगा शाही ह्यांनी अमेरिकन सीनेटर्सपुढे असे जाहीर केले की जर भारताने आपली सर्व अणु–विषयक साधन-सामग्री आंतर्राष्ट्रीय देखरेखीखाली आणली तरच पाकिस्तान तसे करायला तयार होईल. पाकिस्तानच्या अणु-अस्त्रे बनविण्याच्या खटाटोपामुळे जो धोका निर्माण झाला आहे त्याच्यावर अमेरिकेने शोधून काढलेला इलाज असा की भारतीय उपखंडात एक अणु-विषयक प्रादेशिक करार घडवून आणावा आणि आपण अणु-अस्त्रे बनविणार नाही असे बंधन भारत आणि पाकिस्तान यांनी स्वीकारावे. भारताने ह्याविषयीची आपली भूमिका स्पष्ट केली आहे. ज्याच्यातून चीन वगळलेला असेल अशा कोणत्याही प्रादेशिक करारात सामील व्हायला भारत तयार नाही. पण रशियाला शह देण्यासाठी अमेरिकेला सामर्थ्यसंपन्न चीन हवा आहे आणि आजघडीला राष्ट्राच्या सामर्थ्यामध्ये आण्विक शक्तीचा अंतर्भाव निश्चितपणे होतो. अणु विस्ताराविरुद्ध प्रचार करणारी अमेरिका सध्या मध्यम पल्ल्याची अमेरिकन अस्त्रे पश्चिम युरोपमधील राष्ट्रांनी आपापल्या भूमीवर ठेवून घ्यावीत म्हणून त्यांचे मन वळविण्याचा प्रयत्न करीत आहे.

## सागरी उर्जा

समुद्राच्या पाण्यापासून 'इंधन' प्राप्त करून घेऊन 'उर्जेची समस्या' पुरती निकालात काढण्याच्या खटाटोपात अमेरिका आणि रशिया हे दोन्ही देश गुंतले आहेत. सध्या ज्या अणुभट्टया आहेत त्यांच्यात युरेनियमसारख्या मोठ्या अणूंचे विघटन होते आणि त्यातून उर्जा मिळते. अणूपासून उर्जा मिळविण्याचा दुसरा मार्ग म्हणजे हायड्रोजनसारख्या लहान अणूंना एकत्र आवळून त्यांच्या संश्लेषातून ( फ्युजन ) उर्जा प्राप्त करून घेणे. जर अशी नियंत्रित संश्लेषाची प्रक्रिया घडवून आणून स्थिर करता आली तर ही प्रक्रिया चालू ठेवण्यासाठी जेवढी उर्जा खर्च करावी लागेल त्यापेक्षा अधिक उर्जा तिच्यामधून निर्माण होईल. अशा रीतीने उर्जानिर्मितीचा प्रश्न कायमचा सुटेल.

ह्यासाठी अमेरिकेने जे वेळापत्रक बनविले आहे त्याच्या अंदाजाप्रमाणे १९८५ च्या सुमारास ही भट्टी 'समावस्थे'चा टप्पा गाठेल. म्हणजे ती चालू ठेवण्यासाठी जेवढी उर्जा लागते तेवढी उर्जा ती निर्माण करील. त्याच्या पुढचा पल्ला गाठण्यासाठी, म्हणजे जेवढी उर्जा खर्च होते त्याहून अधिक उर्जा निर्माण होण्यासाठी आणखी दहा वर्षे लागतील. रशियाचा ह्याच स्वरूपाचा कार्यक्रम अधिक लवकर यशस्वी होण्याची शक्यता आहे.

रशियन आणि अमेरिकन ह्या दोन्ही भट्टया एकशे ट्रिलियन वॅट उर्जा निर्माण करतील ( एक हजार दशलक्ष = १ बिलियन; एक हजार बिलियन = १ ट्रिलियन)

(पान नं. ३० वरील मजकूर पुढे चालू)

विवरांतून कोंकणात सुळ्कन् उतरून निसटून जातो आणि समुद्राची भेट घेतो. समुद्राच्या पाठीवरही खेळण्या-लोळण्याची आम्हांस संवय आहे. कोंकणांत आम्हांस दूरदेशीचे लोक किती-तरी भेटतात आणि बाहेरील जगाशी आमचा संबंध घडवून आणतात. "

## दत्तोपंत आणि मराठीचे साहित्यकारण

प्रा. दत्तोपंतांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेसाठी आपल्या आयुष्यातील बहुमोल वेळ खर्च केला. ते प्रत्येक साहित्य संमेलनाला उपस्थित असत. त्यांत उपयुक्त कामगिरी करत. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे ते अनेक वर्षे अध्यक्ष होते. मुंबई मराठी साहित्य संघ, विदर्भ साहित्य संघ, मराठवाडा साहित्य परिषद आणि महाराष्ट्र साहित्य परिषद् या चारही संस्थांचे एकीकरण करून एक अखिल मराठी साहित्याचे प्रतिनिधित्व करणारी एक मध्य-वर्ती संस्था स्थापन करावी असे सर्व संस्थांच्या सद-स्यांचे मत होते. त्याचा दत्तोपंतांनी पाठपुरावा केला. आणि मराठी साहित्य महामंडळाची स्थापना झाली. त्याचे दत्तोपंत पहिले अध्यक्ष. महामंडळाच्या वतीने त्यांनी मराठी लेखनपद्धती निश्चित करण्यात निर्णायक कामगिरी केली.

मराठी भाषा, मराठी संस्कृती, महाराष्ट्र धर्म यांजसाठी दत्तोपंतांनी आपले सर्व आयुष्य वेचले. नगर साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. त्यांचे अध्यक्षीय भाषण मराठीच्या आणि महाराष्ट्र धर्माच्या प्रेमाने ओथंबलेले आहे. त्यांच्याच या भाषणातील एक उतारा——

## या ! मराठीची " ईरे " धरून या !

" संमेलनाच्या अध्यक्षपीठावरून शेवटी सर्वांस ऊर्ध्वबाहु होत्साता उच्च स्वराने पाचारण करितो की, सर्व भाषाबंधुहो ! या ! मराठीच्या एक-छत्राखाली आपण सारे एक होऊ या ! यहुदी या, ख्रिस्ती या, मुसलमानभाई या, ब्राह्मण या, ब्राह्मणे-तर या, भगिनी या, पुरुष या, तरुण-तरुणींनो या, स्पृश्यास्पृश्यांनो, पंडित-अपंडितांनो या, गरीब-श्रीमंतांनो या, महाराष्ट्रात राहणाऱ्या आणि मराठी आद्य भाषा असणाऱ्यांनो या ! सारे या ! ज्यांची आद्य भाषा मराठी असेल ते सारे महाराष्ट्रीय म्हणा ! जे मराठीला आद्य भाषा गणीत नसतील त्यांचे इथे काम नाही ! ते पाहुणे म्हणूनच येथे राहतील. आद्यभाषा मराठीचा योग्य करभार तिला पोंचविल्यानंतर आणखी जुन्या नव्या भारतीय भारतीयेतर वाटेल त्या आणि वाटेल तितक्या भाषा शिका. कोणत्याही भाषेचा तिरस्कार करू नका ! आमची धर्मभाषा अमकी आहे, आमची संस्कृतीची भाषा तमकी आहे. असे म्हणून मराठीच्या अग्रमा-नाचा धिक्कार केव्हाही करूं नका ! कोणी केला तर क्षणभरही मानूं नका ! अमुक अमुक उणीव मराठीत आहे. असे तुम्हाला दिसेल तर ती उणीव भरून निघेल एतदर्थ प्रयत्न करा. मराठीसंबंधी " प्रामाण्यबुद्धि " मनात वागविण्यास शिका. जगा-तील पहिल्या प्रतीची विद्वत्ता आणि पांडित्य यांनी मराठी कशी संपन्न होईल ही चिंता मनांत बाळगा."

अनुक्रमणिका

१९४७–१९५४ पर्यंत झालेल्या मराठी पुस्तकांत प्रथम क्रमांकाचे साहित्य अकादमी (नवी दिल्ली)चे रु. पाच हजार पारितोषिक प्राप्त झालेले

# वैदिक संस्कृतीचा विकास

पृ. ६०० ] (सुधारून वाढविलेली नवीन आवृत्ती) [किंमत ३० रु.

लेखक– तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी.

प्रकाशक : प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई (जि० सातारा)

अनुक्रमणिका








हे मासिक पां. गो. आपटे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून
म. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

COVER PRINTED AT PRINTEXT, POONA.




